


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# दीपावली

जय जवान विशेषांक

वर्ष १८ वें फेब्रुवारी १९६३

मूल्य ११ रु.

अनुक्रमणिका








# तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या सिद्धीसाठीं हातभार!

धरतीमातेनें प्रसन्न होऊन अनंत हस्तांनीं दिलेलें लक्षावधि टन धान्य सांठवणीसाठीं गुदामांतून ठेवलें जात आहे...

पण पिकें अमाप यायला हवींत तर प्रथम जमिनीला पाण्याचा पुरवठा वेळच्यावेळीं नि भरपूर होणें आवश्यक आहे. **किर्लोस्कर डिझेल एंजिनें** नेमक्या याच बाबतींत महत्त्वाची कामगिरी बजावीत असतात.

वर्षानुवर्षे खूप अन्नधान्य पिकावें म्हणून नदीनाले, विहिरी, तळीं यांतून पाणी वर खेंचून काढणाऱ्या पंपांना तीं शक्तीचा हमखास पुरवठा करतात.

अनेक वर्षांच्या अनुभवानें नि संशोधनानें पूर्णत्वास पोहोंचलेलीं आणि साऱ्या जगभर उत्कृष्ट दर्जा व हमखास कामगिरीबद्दल नांवाजलेलीं हीं एंजिनें आज तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत हजारों शेतकऱ्यांना अधिक धान्य पिकविण्याच्या कामीं मदत करून भारतीय सरकारपुढील एक महत्वाचा प्रश्न सोडविण्यास हातभार लावीत आहेत.



जय जवान विशेषांक ः• फेब्रुवारी १९६३ •ः वर्ष १८ वें

## २६ जानेवारी ! प्रजासत्ताक दिन ! !

**२६ जानेवारी !** अत्यानंदानें बेहोष व्हावें असा आपला हा गणराज्य दिवस. १९४९ सालीं याच दिवशीं भारतांतील सर्व नागरिकांना सामाजिक, आर्थिक, राजकीय व वैचारिक स्वातंत्र्य लाभलें. या सार्वभौम भरतभूमीवर चीनच्या आक्रमणामुळें प्रचंड संकट कोसळलें. आपल्या राष्ट्राची अशी मानहानी भारतीय वीरांना सहन झाली नाहीं. आपल्या चक्रांकित ध्वजाचा मान अमर रहाण्यासाठीं आपला अशरण ध्वज हातीं घेऊन भारतीय जवान धारातीर्थावर तपाचरण करण्यास गेले. आमच्या हितरक्षणासाठीं ज्यांनीं आपलीं शीरकमलें स्वातंत्र्यसंगरांत अर्पण केलीं त्यांना आणि जे वीराग्रणी सीमा रक्षणार्थ सज्ज आहेत त्यांना हा ' जय जवान ' अंक अत्यंत कृतज्ञतापूर्वक अर्पण.

## *श्रेयनामावलि—*



*संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०-४२ केनेडी ब्रिज, मुंबई ४-या प्रतीस किंमत १। रु. + रजि. पोष्ट ५० न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचीं अधिकृत मतें असतातच असें नाहीं.* प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.

दलाल आर्ट स्टुडिओ
४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४.






# दीपावळी


**दलाल आर्ट स्टूडियो**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४.

टेलिफोन: ७७७६५



तारेचा पत्ता : DALALART


● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० न. पै., द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टूडियोच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ न. पै बटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफीसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकाच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमीजास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.


संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# गिरिकुहरांतला निद्रिस्त हरी आतां जागा झाला !

गेल्या ‘ संघदिना ’-निमित्त झालेल्या–चीनच्या भारतावरील आक्रमणाचा निषेध व्यक्त करणाऱ्या साहित्यिकांच्या सभेंत बोलतांना श्री. पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे म्हणाले कीं–‘ आपल्या या महान राष्ट्राच्या इंच इंच भूमिवर लोकांना आपण प्रेम करायला शिकविलं पाहिजे. लोकांची तशी प्रवृत्ती निर्माण होईल असं साहित्य आपण आतां सातत्यानं लिहिलं पाहिजे ! ’ श्री. देशपांड्यांचे ते शब्द ऐकून ‘ हर हर–हेंहि आम्हांला सांगावं लागावं ना ? ’ असें उद्गार एक दीर्घ निःश्वास सोडून तिथें बसलेल्या एका जाणऱ्या माणसानें काढले. आपल्यावर अशी परिस्थिति यावी याबद्दल त्याला अतोनात वाईट वाटलें; परंतु असें वाईट वाटून घेऊन तरी काय उपयोग ! ‘बैल गेला नि झोपा केला–’ अशी मराठी साहित्याची स्थिति झालेली आहे.

गेलीं दहा वर्षें मराठीच्या साहित्य दरबारांत कामोल्हासाचा जो थयथयाट चालू आहे त्याला तुलना नाहीं. सिद्धीच्या अगदीं जवळ पोहोंचलेले साहित्यांतले भीष्मद्रोणही चळले आणि कामोद्दीपक चूड पेटवून घेऊन आघाडीवर राहिले. या कामोल्हासाच्या उन्मादांत नवी पिढी-न्याय, निति, भजन, मर्यादा विसरली. त्या निष्ठा अव्यवहार्य आहेत म्हणून उपहास करूं लागली. संस्कृतीचीं मानचिन्हें सांगायला जाणाऱ्याला खदखदां हसूं लागली. श्रद्धा गेली आणि सारें गेलें.

परचक्र आलें तेव्हां मात्र आपल्याला खडबडून जाग आली. स्वातंत्र्य, स्वदेश, मानवता, श्रद्धा इत्यादि शब्द आपण भराभर उच्चारूं लागलों. साहित्याच्या बाजारपेठेंत मनाच्या तलवारी गंजून गेल्यावर व लेखणीची दुधारी धार बोथट झाल्यावर आपल्याला त्या शब्दांची आठवण झाली; पण या शुद्धिकरणाला आतां किती वेळ लागेल परमेश्वर जाणे.

गेल्या पाव शतकापूर्वीच्या मराठी वाङ्मयधनाचें अवलोकन केलें म्हणजे नीतीच्या बाबतींत आपण किती विराट आणि व्यापक होतों याची प्रचीति येते.

साऱ्या विश्वानें आपल्याजवळ निवारा मागावा, आसरा मागावा इतके आम्हीं मोटे होतो. लहान-थोर एका विशिष्ट उच्च विचारसरणीनें वागत होते. विश्वास होता. श्रद्धा होती. भक्ति होती. परंतु गेल्या दहा वर्षांत देशांतल्या इतर व्यापाराबरोबरच साहित्य हाही एक व्यापार होऊन बसला. जें जें इतर व्यापाराच्या बाबतींत झालें तें तें साहित्यांतहि घडूं लागले. मागणी तसा पुरवठा अशी परिस्थिति झाली. (पानवाला देखील संपादक म्हणून साहित्याच्या या बाजारपेठेंत मुक्त संचार करूं लागला आणि महाराष्ट्र सरकानें याबाबतींत हल्लींच थोडेसें कडक धोरण अवलंबिल्यापासून तर म्हैसूर राज्यांत जाऊन अशा मासिकांचें उत्पादन वाढवायचा कांही लोकांचा विचार चालू असल्याचें ऐकूं येतें. असो ! )

मराठी साहित्यांतील स्थितप्रज्ञावस्थेला पोहोंचणारे लेखकहि या मागणीला आणि आमिषाला बळी पडले आणि दोषी ठरूं नये म्हणून समर्थनें करूं लागले. जिकडे तिकडे भोगवाद थैमान घालूं लागला. ‘ फ्रायडच्या विचारांना लागलेल्या या विकृत वळणाचें पाऊल नित्य पुढेंच पडत आहे; व तें आतां मागें पडावें असें फार वाटतें, अशा अर्थाचे विचार एका थोर इतिहास-संशोधकानें व विचारवंतानें परवांच्या आपल्या एका व्याख्यानांत काढलें; परंतु या विषयावर मर्मभेदक प्रहार या विचारवंतांनींच करावा असें मात्र राहून राहून वाटतें; पण प्रत्यक्षांत तें घडत नाहीं.

आणि तें घडलें नाहीं तरी आतां पर्वा नाहीं. गिरीकुहरांत भ्रमानें निद्रित असलेला हरी आतां जागा झालेला आहे. त्याच्या एकाच डरकाळीनें दुष्टता, हीनता, वास्तववादाच्या नांवाखालीं धिंगाणा घालणारी बेशरम अनीति हीं सारीं भुतें अंधारांत पळून जात आहेत. आणि सत्प्रेरणेचा उदयकाल दिसूं लागलेला आहे. माणुसकीचे आटलेले झरे ओझरूं लागलेले आहेत. जिकडे तिकडे राष्ट्रप्रेमाचें नवचैतन्य फुलून आलेलें आहे. या स्थितीचा पूर्ण विकास होईल याबद्दल आतां शंका नाहीं.

सुदैवानें दीपावलीला सुरुवातीपासूनच उच्च विचारसरणीनें परिपूर्ण आणि देशहितचिंतक अशी पिढी सहाय्यक म्हणून लाभली. जानेवारी




अनुक्रमणिका










श्री. संपादक, 'दीपावली' यांसः—

दीपावलींतून क्रमशः प्रसिद्ध होणाऱ्या श्री. जयवंत दळवी यांच्या लेखमालेचा मी एक नियमित वाचक आहे. मी स्वतः कुडाळचा असल्यानें या लेखमालेंतल्या सर्व व्यक्ति-काल्पनिक असल्या-तरी माझ्या परिचयाच्या आहेत. श्री. जयवंत दळवी यांनीं त्यांचें चित्रण इतकें वास्तविक स्वरूपांत केलेलें आहे कीं त्याबद्दल त्यांचें अभिनंदन करावें तितकें थोडेंच. त्यांची वर्णनशैली इतकी मार्मिक आहे कीं, त्यांच्या लेखमालेतल्या त्या सर्व व्यक्ति प्रत्यक्ष आपल्याभोंवतीं चालताबोलताहेत असें वाटतें. ज्यांनीं तिथें जीवन घालविलेलें आहे त्यांच्या तर हंसून हंसून मुरकुंड्या वळतात.

दळवी यांची ही लेखमाला पुस्तकरूपानें कधीं प्रसिद्ध होणार ? आणि ती कोण प्रसिद्ध करणार ? हें कळविण्याची तसदी घ्यावी. कारण पुस्तकाच्या कांहीं प्रती आम्हांला गांवीं पाठवायच्या आहेत.

आपला,

**आत्माराम अनंत मांद्रेकर,**

ठळकवाडी, बेळगांव.

(पुस्तक केव्हां प्रसिद्ध होईल हें लवकरच कळवूं. —**संपादक**)

श्री. संपादक, 'दीपावली' यांसः—

यंदाच्या दीपावलीच्या दिवाळी अंकांतला श्री. पु. ल. देशपांडे यांचा 'माझें खाद्य जीवन' हा लेख फारच आवडला. आपल्या नाटकी जीवनाचे अनुभव त्यांनीं वेगवेगळ्या लेखांतून थोडे थोडे सांगितलेले असले तरी 'असा मी' किंवा 'खाद्य जीवन' यांसारखे ते एकत्रित नाहींत. या विषयावर ते लिहितील अशी आशा आहे.

जयवंत दळवी यांचा 'सारे प्रवासी घडीचे' हा दीर्घ लेख आवडला. 'बरें झालें देवा' या लेखमालेंतले आचार्य अत्रे व उदय शंकर यांचे लेख आवडले. तुमची व्यंगचित्रमाला फार छान वाटली. चित्रांची छपाई तेवढी आकर्षक झाली नाहीं हें नमूद करण्यास खेद वाटतो. कथाचित्रें मात्र अप्रतीम वाटलीं.

आपली,

**सरोज पांडे,**

माटुंगा, मुंबई.

संपादक, दीपावली यांसः—

आजच्या महाराष्ट्र टाइम्समध्यें असंख्य वाचकांच्या मतांनीं यंदाच्या दीपावली वार्षिकांतली 'विघ्नहर्ति' ही अरविंद गोखले यांची कथा सर्वोत्कृष्ट व सर्वश्रेष्ठ ठरल्याचें वाचून अत्यंत समाधान वाटलें. प्रतिवर्षी अशा साहित्याच्या बाबतींत दीपावलीची निवड चोखंदळ असतेच. माझ्याप्रमाणेंच नियतकालिकांत येणारा तुमच्या वार्षिकाचा अभिप्राय हेंच सांगतो. विघ्नहर्तिप्रमाणेंच आणखीहि कांहीं कथांचा उल्लेख या अभिप्रायांत आहे. एकंदरींत तुमच्या या अद्वितीय यशाबद्दल तुम्हांला धन्यवाद. तसेंच अरविंद गोखल्यांनाहि. कळावें.

आपला,

**वसंत श्री. प्रधान**

वांद्रें पूर्व

संपादक दीपावली यांस

तुमच्या जानेवारीच्या अंकांतील रणजित देसाई यांची 'कोणे एके काळीं' ही कथा फार सुंदर वठली आहे. या पूर्वींच्या दीपावलीच्या अंकांत त्यांची कौन भ्रम भूले ही कथाहि उत्तमच वठली होती. असले कथा प्रयोग श्री. रणजित देसाई फार चांगले करतात. त्यांनी लिहिलेली 'रंगल्या रात्रीं' ही चित्रकथाहि अशीच रंजक आहे. फेब्रुवारी महिन्यांत त्यांची गोष्ट असणार काय ? त्यांना माझे धन्यवाद कळवावे. कळावें.

आपली नम्र,

**शालिनी गोडबोले**

धुळें.

(रणजित देसायांना धन्यवाद कळविले आहेत चालू अंकांत त्यांची कथा आहेच. --**संपादक**.)

**तन, मन आणि धन म्हणजेच सुवर्ण ! राष्ट्राला त्याचीच आवश्यकता आहे.**




महिन्याच्या अंकांतलें वेंचक साहित्य हा उत्तम संकलनाचा नमुना अशी कित्येक रसिक वाचकांनीं मनापासून स्तुति केली. याचें सारें श्रेय या सहाय्यक मित्रांना आहे. अमक्याचें अमुक साहित्य चांगलें आहे, आणि तें दीपावलींत आलेंच पाहिजे असा आग्रहहि त्यांचा आणि तें मिळवून देण्याचे श्रमहि त्यांचेच. उत्तरोत्तर असें उच्च विचारसरणीचें साहित्य देत राहूं अशी आशा व्यक्त करतो.

•••












ॐ खड्ग वीराच्या हातांत असतां पराक्रमाचें साधन होतें तेंच बालकाच्या हातांत असतां अपघात घडवितें. हलाहल भगवान शंकराच्या कंठांत असतां जगाचें कल्याण करते तेच तेथून निघाल्यावर त्रिभुवनाचा दाह करतें. सद्‌गुण अथवा दुर्गुण योजकाच्या कुवतीप्रमाणें फलद होतात. भारताच्या इतिहासाच्या घड-णींत तत्त्वज्ञानानें जो भाग घेतला आहे तो पहिला म्हणजे हीच गोष्ट पटावयास वेळ लागत नाहीं. ज्ञान हें सर्व गोष्टींत श्रेष्ठ आणि तत्त्वज्ञान हें सर्व ज्ञानांत श्रेष्ठ हें तर खरेंच. पण श्रेष्ठतम गोष्टहि कल्याणप्रद व्हावयास हवी असेल तर तिच्या उपयोगांत तोल आणि योज-कता हवी. भारताची तत्त्वज्ञानप्रियता अनेकदां शत्रूंचा आणि क्वचित प्रसंगी आपलाच आपल्याबद्दल गैरसमज घडावयास कारण झाली आहे.

भारताचा मनोपिंड असा आहे कीं त्याच्या पौरुषाचा धगधगित अंगार संकटाचा झंजावात वहात नसेल तेव्हां तत्त्वज्ञानाच्या राखेखालीं लपलेला असतो. ही राखच ज्यांना दिसते अशा शत्रूंना त्यामुळें भारताची सुवर्णभूमी हें मोकाट चरावयांस उत्तम कुरण आहे असें वाटतें. त्याला राखेखालचा अंगार "दिसतच नाहीं. आणि असा एखादा आततायी" फुंकर घालून राख उडविण्यास प्रवृत्त झाला तर त्या फुंकरीनें अंगाराचा भडका होतो आणि त्यांत आततायी शत्रूची पूर्णाहुती पडल्यावरच तो शांत होतो.

कृण्वंतो विश्वमार्यम ॥ असा उद्‌घोष करत पौरुषाची आणि उच्चतर संस्कृतीची कांस धरून विश्वविजय करीत निघालेले आर्य भार-तांत आले आणि स्थिरावले. या सुवर्णभूमीचा लाभ होतांच 'जितं मया' अशी तृप्ती त्यांना लाभली. उदंड जाहलें पाणी । स्नान-संध्या करावया ॥ अशी वृत्ती झाल्यामुळें पौरुषा-वर आंवर पडला आणि भरल्या पोटीं तत्त्वज्ञान सुचूं लागून ते बळावले. अशावेळीं भारतावर

पहिलें ज्ञात परचक्र आलें. विशेष म्हणजे पुढील अनेक परचक्रांप्रमाणें हें परचक्र उत्तरेकडील पर्वत लंघून आलें नव्हतें. त्यावेळीं पर्वतांच्या पलीकडे भारतियांना शत्रूच नव्हतें. तिबेटपासून तो तहत बलुचिस्थानपर्यंत सर्वत्र भारतीय आर्यांचे बांधव अथवा संबंधी पसरले होते. शत्रू होते ते दक्षिणेकडे. आणि हें परचक्र दक्षिणेकडूनच समुद्र ओलांडून आलें.

हें परचक्र म्हणजे अर्थातच रावणाचा दिग्विजय होय. रावणानें समुद्र लंघून भारतावर स्वारी केली आणि तहत हिमालयापर्यंत चाल करून जे जे म्हणून वीर होते त्यांना ठेंचून काढलें. सातपुडा पर्वताच्या रांगेला धरून तहत त्यावेळीं उपयोग झाला. आजच्या युद्धप्रयत्नांत कुत्र्यांसारखे प्राणी जे पराक्रम करतांना आपण पहातों त्यावरून श्रीरामचंद्राच्या युद्धप्रयत्नांत प्राण्यांचा उपयोग झाला असावा याची शंका घ्यावयास नको.

श्रीरामचंद्राच्या पराक्रमानंतर भारताकडे वांकडी दृष्टी करून पहाण्याचें सामर्थ्य कोणाही शत्रूस सुमारें दोन हजार वर्षें झालें नाहीं. इदं ब्राह्मं ॥ इदं क्षात्रं ॥ अशा उभयविध तेजाचा प्रकाश भारतांतून दशदिशांना दैदिप्यमानपणें तळपत राहिला. शांतिः ॥ शांतिः ॥ शांतिः ॥ असा उद्घोष पर्वतापर्वताच्या कुशींतून विस्तारलेल्या आश्रमा आश्रमांतून होत ही सत्य, अहिंसा अशा दैवी गुणांची कराची हें त्यांनीं कधींहि नाकारलें नाहीं. पण विंचवाची नांगी अथवा नागाची फणा ही दगडानेंच ठेचावी याचा विसरहि त्यांनीं पडूं दिला नाहीं. साधूंचें परित्राण करणें यांतच अवताराची परिसमाप्ती त्यांनी मानली नाहीं तर दुष्कृतांचा नाश करणें हेंही त्यांनीं कर्तव्य मानलें.

अधर्माची अवधी तोडी ॥
दोषांचीं लिहिलीं फाडीं
सज्जनाकरवीं गुढी ॥ सुखाची उभवी ॥
दैत्यांचीं कुळें नाशी ॥ साधूंचा मानु गिंवशी ॥ असे द्विविध कर्तव्य त्यांनीं मानिलें.

# अवतरें मी युगीं युगीं.............

—आनंद साधले

गंगा–यमुना संगमापर्यंत आपला अंमल बसविला खर, दूषण, त्रिशिरा, मारीच, सुबाहु इत्यादी सुभेदार इथें ससैन्य ठेवले. अनेक भारतीय राजे जेऊन दास केले.

हें परचक्र जेव्हां आलें तेव्हां तत्त्वज्ञानाच्या गोंधळांत पौरुष अडकलें होतें. तत्त्वज्ञान कितीही श्रेष्ठ असलें तरी तें राजकारणाचें हत्यार नव्हें. त्यामुळें रावणाच्या झंझावातापुढें भारताचें कांहीं चाललें नाहीं. पण या नामुष्कीच्या परिस्थितीचा बरोबर वेध विश्वामित्रानें घेतला. त्यानें या ज्ञानाचा डोळस वापर करून नवें सामर्थ्य निर्मिलें. आपल्या या ब्राह्म अशा सामर्थ्याची जोड श्रीरामचंद्रांच्या हातीं दिली आणि उन्मत्त अशा रावणानें जेव्हां भारतमातेचा पदर ओढून या पौरुषास डिंवचण्याचा प्रयत्न केला तेव्हां फुललेल्या अंगारांत त्या उद्दाम महापुरुषाची पूर्णाहुती पडल्यावरच तो अंगार शमला. या महान आणि अभूतपूर्व रणसंग्रामासाठीं जेव्हां श्रीरामांनीं आपलें कोदंड टणत्कारिलें तेव्हां आहिमाचलसेतू भारत जागा होऊन तृणकाष्ठांतूनही अग्नीचे धुमारे प्रकटले. पोकळ तत्त्वज्ञानाची कांस सोडून रामचंद्रांनीं यावेळीं राजनीती अवलंबिली आणि शत्रूचा मित्र तो आपला शत्रू या सरळ न्यायानें वालीचा वध करून सुग्रीवाच्या सहाय्यानें अचाट युद्धप्रयत्न उभारला. हा युद्धप्रयत्न एवढा सर्वव्यापी होता कीं खारी, भुंगे इत्यादी नगण्य प्राण्यांनाही असला तरी ही शांति अस्मितेच्या पायावर उभारलेली नव्हती. ती ' सर्वेपि सुखिनः सन्तु ॥ सर्वे भद्राणि पश्यन्तु ॥ ' अशा परमोदात्त बंधुभावावर उभारलेली होती. या बंधुभावाचें रक्षण आणि असुख व अभद्र यांचा नाश करण्यासाठीं सूर्यासारखें प्रखर तेज संपादन व्हावें म्हणून इथें 'योयोनः प्रचोदयात्' असा गायत्री मंत्राचा उद्घोषहि त्रिकाल चाललेला होता.

भारतीय समाजाला अनेक द्रष्टे असे लाभले की सुवर्णमध्यासारखा प्रगतीकडे खास नेणारा मार्ग त्यांनीं बरोबर हेरला. उपासना आणि पूजा राग–लोभ, असत्य–सत्य, विष–अमृत, क्रोध–शांति, हिंसा–अहिंसा इत्यादि सार्‍याच द्वंद्वांचा तोल सांभाळला तरच जीवनाचा तोल सांभाळला जाईल याचा विसर त्यांना पडला नाहीं. स्वतः निस्संग असलेल्यांना सुद्धां वैष्णवाचें वर्णन करतांना तें ' भले तरी देऊं सोडूनी लंगोटी ॥ नाठाळाचे काठी मारूं माथां ॥ असेंच करावें लागलें. केवळ आत्मोद्धाराची स्वार्थी तळमळ बाळगणाऱ्या मूठभर वनौकस मुमुक्षूंनीं स्थितप्रज्ञतेची पराकाष्ठा करून निस्संगाची एकांतिक मजल गांठली असली तरी

पान ५९ वर.

चालू राजकीय गणित......



चिनी सैन्य–अधिक मृत्यु म्हणजेच शांतता.

# दान

—रणजित देसाई

*चिनी नरपशूंच्या राक्षसी वर्तनानें मानभंग पावलेली, पण तरीहि कर्तव्यतत्पर अशा भारतीय मोनपा वीरांगनेची ही समरकथा...*

अमर मोठ्या कष्टानें पावलें टाकीत होता. पायांतले बूट व हातमोजे निघून गेले. तसाच अंगावरचा ओव्हरकोटही गेला तर फार बरें होईल असें त्याला वाटत होतें. बर्फाच्छादित पर्वतावरून येणारा गार वारा सारें अंग बधीर करीत होता तीन दिवस त्या पर्वतमय मुलखांतून चालून चालून अमरचे पाय सुजले होते. पायाच्या वेदना आतां फारशा जाणवत नव्हत्या. पठार मागें टाकून अमरनें आतां देवदार-चीड वृक्षांनी माखलेल्या प्रदेशांत प्रवेश केला होता. समोरची वाट चालण्याखेरीज दुसरा कसला विचार मनांत येत नव्हता. चिन्यांनीं अकस्मात केलेला हल्ला, सहकाऱ्यांची झालेली कत्तल हें सारें विसरण्याचा तो प्रयत्न करीत होता. मिळेल त्या वाटेनें कँप गांठण्याची आज्ञा घेऊन जें थोडें सैनिक परतले त्यांतच अमर एक होता. बाकीचे कुठें, कोणत्या वाटेनें परतले, त्यांची चुकामुक केव्हां झाली हेंही अमरच्या ध्यानीं आलें नाहीं. तीन दिवस उपाशी अमर त्या निर्मनुष्य भागांतून फिरत होता. क्षणाक्षणाला त्याचें अवसान कमी होत होतें. प्रत्येक पावलागणीक पाठीवर हेंदकळणारी रायफलीची साथ घेत तो चालत होता. मान खालीं घालून वारा चुकवत चालत असतां त्याच्या कानावर पाण्याचा आवाज पडला. त्यानें मान वर केली.

अमरनें पाहिलें तो समोर जोरानें खळखळाट करीत जाणारा ओढा दिसत होता. ओढ्यावरच्या बांबूच्या पुलानें त्याचें लक्ष वेधून घेतलें. त्यानें आजूबाजूला नजर फिरवली. देवदाराचे प्रचंड गोलांडे वृक्ष उंच आकाशांत चढले होते. संध्याकाळच्या लांब सावल्यांनीं जमिनीवर रेघोट्या मारल्या होत्या. ओढ्यापलीकडे टेकडीचा चढ दिसत होता. त्यानें लक्ष त्या टेकडीच्या माथ्यावर स्थिर झालें. त्या टेकडीवर एक झोपडी दिसत होती. झोपडीच्या छपरांतून पांढरा धूर उठत होता. पसरत होता. वस्तीची जाणीव होतांच अमरच्या चेहऱ्यावर हांसूं उमटलें. पण त्याबरोबर गारटलेल्या ओठांतून कळ उठली. अमरनें सारें बळ एकत्र केलें आणि तो चालूं लागला. पुलावरून त्यानें ओढा ओलांडला आणि तो टेकडी चढूं लागला. मोठ्या कष्टानें तो एक पाऊल उचलत होता. धाप लागत होती. टेकडीच्या माथ्यावर येऊन त्यानें वर नजर केली. झोपडीच्या दाराशीं एक व्यक्ति उभी होती. कपड्यावरून ती स्त्री आहे हें अमरच्या ध्यानीं आलें. त्यानें काखेला लावलेल्या दुर्बिणींतून खात्री करून घेतली आणि तो गडबडीनें चालूं लागला. पण पायावर संपूर्ण सत्ता नाहीं हें त्याच्या ध्यानीं आलें नाहीं. चार पावलांवर तो पडला. धापा टाकत हाताच्या बळावर अमर उठण्याचा प्रयत्न करीत होता. त्याचवेळीं त्याच्या कानावर पावलांचा आवाज झाला. चमकून त्यानें वर पाहिलें. ती स्त्री धावत येत होती. अमरच्या शेजारीं येऊन ती स्त्री थांबली. ती अमरला निरखित होती. अमर म्हणाला—

'हिंदी, फ्रेंड!'

त्या स्त्रीच्या नजरेंत हास्य चमकलें. तिनें होकारार्थी मान हलवली आणि गडबडीनें ती अमरला उठवूं लागली. अमर कष्टानें उभा राहिला. त्या तरुण स्त्रीनें अमरचा हात आपल्या मानेभोंवती घेतला आणि तिच्या आधारानें अमर चालूं लागला. झोपडीच्या दारांत येईपर्यंत दोघेही थकले होते. त्या स्त्रीनें लाथेनें दार उघडलें, आंत कोणी नव्हतें. बांबूफळ्यांनीं ती झोपडी बांधली होती. दोन खोल्यांची ती झोपडी होती. त्या स्त्रीनें अमरला तिथल्या बांबूच्या खाटल्यावर बसवलें. आपला घाम पुसत ती क्षणभर उभी राहिली. जाड भुवयांखालीं हंसरे किलकिले डोळे, पातळ ओठ, किंचित बसकें नाक असलेली ती स्त्री क्षणभर अमरकडे पहात उभी राहिली. क्षणांत तिच्या चेहऱ्यावर हासूं फाकलें. स्वतःकडे बोट दाखवत ती म्हणाली, 'अपीर.'

तशा परिस्थितींतहि अमर हंसला तो तिच्याकडे बोट दाखवत म्हणाला 'अपीर.'

स्वतःचें नांव ओळखल्याचा तिला आनंद झाला. झोपडीच्या खिडकींतून गार वारा आंत येत होता. तिकडे लक्ष जातांच तिनें खिडकीचा झाप बंद करून घेतला. अमर



खाटल्यावर बसूनच होता. अंपीरनें जमिनीवर टेवलेला बैठा हातमाग बाजूला सारला आणि अमरजवळ जावून तिनें त्याचे कपडे उतरायला सुरवात केली. जेव्हां ती पँटही उतरूं लागली तेव्हां अमर अस्वस्थ झाला. पण कसलाही विरोध करण्याची ताकद त्याच्याठायीं उरलेली नव्हती. बघतां बघतां अगदीं हळूवार हातानें अंपीरनें अमरला विवस्त्र केलें. त्याला अलगद खाटल्यावर झोपवलें आणि जाडजूड पांघरूण त्याच्या अंगावर टाकलें. अमरचीं बोटें निळसर भासत होतीं. पायांतून व हातांतून कळा उठत होत्या. अंपीर गडबडीनें आंत वळली. आंतून शेगडी आणून तिनें खोलींत ठेवली. खाटल्याखालीं ठेवलेली लाकडी पेटी तिनें ओढली. पेटींतून कातड्याचा मोत्रा काढून तिनें ती पेटी परत सरकवली. आंतून तिनें चुनगा आणला. त्या बांबूच्या पेल्याकडे अमर कौतुकानें पहात होता. मोत्र्यांतलें मद्य चुनग्यांत ओतून तिनें अमरला उठण्याची खूण केली पण अमर उठूं शकला नाहीं. तो चुनगा जमिनीवर टेऊन तिनें अमरला बसतें केलें आणि तो पेला अमरच्या ओटीं लावला. उग्र दर्पानें सारी झोपडी दरवळत होती. दोन घोट घशांत उतरतांच ती तांदळाची दारू आहे हें अमरनें ओळखलें. त्यानें विचारलें.

'अपाँग ?'

अंपीरनें होकारार्थी मान हलवली. जेव्हां अमर नेफाला गेला होता तेव्हां अनेकवेळा त्यानें मोनपांच्या अपाँगची चव घेतली होती. चार घोट पोटांत जातांच अमरला किंचित बरें वाटलें. त्यानें पुरें म्हणून हातानें खुण केली. अंपीरनें त्याला झोपवलें आणि अंपीर अमरच्या अंगाला ती दारू चोळूं लागली. अमर हें सारें पडल्या जागेवरून पहात होता. पण अंपीरचें त्याच्याकडे लक्ष नव्हतें. हळुहळूं अमरला आपल्या नग्नतेचा संकोच वाटेनासा झाला. आपलें शरीर अंपीरच्या स्वाधीन करून त्यानें डोळे मिटले.

अंपीरचे हात थांबल्याचें जाणवतांच अमरनें डोळे उघडले. अंपीर कानोसा घेत होती. ती भरकन् उठली. तिनें झाप कलता करून बाहेर पाहिलें. क्षणांत ती माघारी वळली. तिनें अमरचे कपडे, रायफल सारे उचललें व आंत नेलें. परत येऊन तिनें खुंटीवरचे कपडे जमिनीवर टाकले. भरकन आपला कातडी कोट भिरकावला आणि तोंडावर बोट ठेवून तिनें अमरला न बोलण्याची खूण केली. अंपीरचा चेहरा भीतीनें काळवंडला होता. तिनें पांघरूण सरकवलें आणि क्षणांत ती अमरच्या शेजारी झोपली. तिनें दोघांवर पांघरून ओढून घेतलें. एक हात अमरच्या गळ्याभोंवती टाकला. तिचे निःश्वास अमरच्या गालाला जाणवत होते. त्याचवेळीं बाहेर पावलें वाजली. दारावर लाथ बसली. दार उघडतांच बंदूक रोखून आंत आलेला चिनी दोघांना दिसला. पाठोपाठ चार चिनी आंत घुसले. त्यांचे हिडीस चेहरे पहातांच अमरला भान राहिलें नाहीं. तो उठणार हें पहातांच अंपीरनें त्याच्या गळ्यावरचा हात दाबला.

विस्फारित नेत्रांनीं दोघांना पहाणाऱ्या त्या चिन्यांच्या चेहऱ्यावर क्रूर हास्य चमकलें. एकजण पुढें झाला. त्यानें पांघरूण ओढलें. अमरच्या गुढघ्यापर्यंतचा भाग एकदम उघडा पडला. नग्न अमरला पहातांचे पाचीजणांच्या हंसण्यानें ती झोपडी भरून गेली. अंपीर खाटल्यावरून सरकत सरकत भिंतीला टेकून उभी राहिली. एका चिन्यानें वास घेतला. बुधला पहातांच तो झेपावला. एकाच्या हातांतून दुसऱ्याच्या हातांत बुधला फिरत होता. हंसत ते अपाँगची चव घेत होते. अमरच्या छातीला बंदुक लावून एक चिनी उभा होता. साऱ्यांचें लक्ष आंतल्या खोलीकडे सरकणाऱ्या अपारकडे लागलें होतें. अंपीर भीतीनें थरथरत होती. तोच एक चिनी पुढें झाला. अंपीर आंतल्यां खोलींत धांवली. पाठोपाठ तिघे चिनी हंसत धांवले. अमरवर बंदुक रोखून एक चिनी तसाच उभा होता. राक्षसी हास्य त्यांच्या चेहऱ्यावर उमटलें होतें. दुसरा चिनी दाराशीं बंदुक घेऊन उभा होता.

आंतल्या खोलींतून धडपड ऐकूं येत होती. एक अस्पष्ट किंकाळी उठली. कपड्यांचे आवाज झाले. हंसण्याच्या आवाजांत हुंदक्यांचा आवाज ऐकूं येईनासा झाला.

बऱ्याच वेळानें तिन्ही चिनी कपडे सारखे करीत बाहेर आले. चिनी भाषेंत त्यांनीं कांही तरी सांगितलें. आंतून आलेल्या चिन्यांपैकीं एकानें अमरचा ताबा घेतला आणि बाहेर राहिलेले दोघे चिनी हंसत आंत गेले. पुन्हा थोडी धडपड ऐकूं आली आणि परत सारें शांत झालें.

जेव्हां ते दोघे बाहेर आले तेव्हां त्यांनीं बाहेरच्या खोलींतल्या सामानाची उलथापालथ केली. एकानें अमरचे हात बांधले आणि अमरच्या अंगावरचें गरम पांघरूण ओढून तें कांखेला लावत तो इतरांबरोबर बाहेर पडला.

अमर तसाच पडून होता. अंगाला गारवा झोंबत होता. सामसूम झाल्यावर त्यानें उठण्याचा प्रयत्न केला पण उठतां आलें नाहीं. थोड्यावेळानें त्यानें कानोसा घेतला आणि सारें बळ एकवटून हाक मारली,

'अंपीर ऽऽ अंपीर ऽऽ'

आंत हालचाल ऐकूं आली. कांहीं वेळानें अंपीर दारांत उभी राहिलेली अमरला दिसली. आपले केस सारखे करीत ती अमरजवळ आली. तिनें दुसरें पांघरूण अमरच्या अंगावर टाकलें आणि खाटल्यावर बसून ओंजळीत तोंड लपवून ती रडूं लागली.

बराच वेळ अंपीर तशीच रडत होती. दाराशीं पावलें वाजलीं. दाराशीं मोनपा तरुण उभा होता. त्यानें अमीरवर नजर टाकली. अंपीरनें मान वर केली. तो तरुण दिसतांच ती त्याला बिलगली. अंपीरचा चेहरा हातांत घेऊन त्या मोनपानें तिच्या चेहऱ्यावरच्या जखमा पाहिल्या. त्याची नजर अमरवर वळली. कमरेचा सुरा काढून तो पुढें झाला. त्यानें अमरचे हात सोडले. तें करीत असतां अंपीर त्याला कांही तरी सांगत होती. अंपीरनें दिवा पेटवला. तो मोनपा तरुण अमरजवळ येत म्हणाला,

'हम हिंदी ! फ्रेंड' छातीवर हात मारत तो सांगत होता 'तानी ! तानी.'

अमर हंसला. म्हणाला 'अमर ! फ्रेंड'

तानीनें झटकन अमरचा हात प्रेमभरानें हातांत घेतला व म्हणाला 'हां ! कँप जाना ?'

'हां हां !' अमरनें मान डोलावली.

हातवारे करीत तानी म्हणाला, 'मै कँप ! चलो.'

तानीनें अमरचें पांघरूण काढलें. अंपीरनें आणलेले कपडे अमरच्या अंगावर चढवले. तानीनें रायफल खांद्याला लावली. अमर दोघांच्या आधारानें झोपडीच्या मागें आला. टेकडीच्या पायथ्यांशीं असलेल्या दोनचार झोपड्या जवळ होत्या. चांदण्याच्या उजेडांत त्या भयानक वाटत होत्या. तानी म्हणाला, 'चिनी' आणि पचकन् तो थुंकला. एका देवदार वृक्षाला घोडे बांधले होते. तानी व अंपीरनें अमरला घोड्यावर बसवलें. तानीनें अंपीरला कांहींतरी सांगितलें आणि लगाम हातीं धरून तानी चालूं लागला. अमरनें वळून पाहिलें. टेकडीच्या माथ्यावर उभी असलेली अंपीर हात हालवत होती.

● ●

## आणखी एक ' बचत '



' अहो ' ही एवढीशी बचत कुणासाठीं ? '

पेटी, ढोलकं, तुणतुणं, पखवाज, झांजा असं साहित्य त्यांत आणून ठेविलेलं होतं. गांवांतल्या रिकामेटेकड्यांचा रंगमहालांत नेहमीचा अड्डा होऊन बसला होता. आळीपाळीनं चहापाट्या, ललितं, तमाशे आणि भजनं असा धबडगा तेथें नेहमीं चालू असायचा. जरूरीचं घरगुती, व्यवहाराचं काम आणि जेवण या कामाव्यतिरिक्त बापूसाहेब रंगमहालाबाहेर सहसा पडत नसत.

आणि आतांशा जेवायला तें घरी आले कीं म्हातारीची त्यांच्या मागें टुरटुर लागायची.

' बापू ! अरे बापू ! ! या भुरीला एकदांची पिवळी करून टाक रे बाबा म्हणजे सुटले मी. अरे लोक शेण घालायला लागले कीं रे तोंडांत. म्हणतात दोन लेकरांची आई शोभते म्हणून. '

' म्हणूं देत. वेळ आली की सर्व कांहीं होईल. ' बापूसाहेब उत्तर देत.

' अरे पण आणल्याशिवाय का वेळ येते ? ' म्हातारी ताणून धरी.

' भारीच बुवा पीरपीर तुझी आई. आम्हालाहि कांहीं कळतं का नाहीं ! स्थळं पाहातों आहे. पण पटायला हवं. नको का ? ' बापूसाहेब.

' मग माजलगांवच्या त्या सावकार कुळकर्ण्याच्या मुलाचं स्थळ का वाईट होतं ? ' म्हातारी म्हणे.

' आतां काय सांगाचं आई तुला ? बसल्या बसल्या पाटीलकी करायला काय जातं तुझं ! माजलगांवला जाऊन आलो. पोरगं पाहिलं. तुला पुरुषांत नसलेला नातजावई चालेल का ?' बापूसाहेब सवाल करीत.

' राहिलं. मग ते देशमुख पोस्टमास्तर का वाईट होते ? ' म्हातारी माघार घेत नसे.

' कोण तो देशमुख...तिसरी बायको करायला निघाला तो. पन्नाशी उलटली आहे त्याची. पुढच्या दातांनी रजा घेतली आहे... जाय आई...त्यापेक्षां गप्प बस ना तूं ' बापूसाहेब चिडत.

आणि ही अशी सवाल-जबाबी सुरू झाली कीं सुलभाच्या अंगाचा तीळपापड उडे. वडील आपल्यासाठीं चांगलं स्थळ पहाण्याचा विचार करीत असतात ही गोष्टहि तिला अशावेळीं आश्वासनात्मक वाटत नसे. तिला वाटे असंच पुढं व्हावं आणि सर्वांना बजवावं,

' कोणी कोणी माझ्या लग्नाचा विचार करण्याची जरुरी नाहीं. मी पोपटशीं लग्न करणार आहे. त्याचा हात धरून जाणार आहे. नाचणारी कोल्हाटीण होणार आहे. '

× × ×

पोपटनं सुलभेचं लक्ष आकर्षून घेतलं होतं. घरातलं एकत्र कुटुंबी निष्प्रेम वातावरण, वाढलेलं वय, वयाच्या पंधराव्या वर्षापासून सतत लग्नाची कानींकपाळीं ऐकूं येणारीं बोलणीं आणि तारुण्य-सुलभता यामुळेंच हें घडलं होतं. पोपट नाच्या पोऱ्या असला तरी त्याच्यामध्यें बायकीपणाबरोबरच एक पुरुषी व्यक्तिमत्व आणि आकर्षणहि होतं. त्याचा बांधा सुडौल होता. मुद्रेवर सारखं हास्य विलसलेलं असायचं. दिसायला तो गोऱ्यांतच जमा झाला असता बायकांसारखे केस त्यानें वाढविलेले असले तरी आपल्या काळ्याभोर केशसंभारामुळें तो एखाद्या कृष्ण कन्हय्यासारखा भासायचा. खेड्यांतल्या तरुणांच्या मानानं तो कितीतरी स्वच्छ आणि नीटनेटका रहात असे. त्याचं बोलणंहि गोड असायचं. तमाशासारख्या व्यवसायांत पुष्कळ बीभत्सपणा करावा लागत असला तरी नेहमींच्या वागणुकींत असलं कांहीं त्याला खपत नसे आणि तसलं कांहीं त्याच्या तोंडूनहि बाहेर पडत नसे.

देशपांड्यांच्या घरांत तो घरच्यांपैकींच एक झाला होता. कुणा-लाहि तो परका वाटत नसे. त्याच्या जेवणाखाण्यांत कोणताहि पंक्तिप्रपंच करायचा नाहीं अशी सक्त ताकीद बापूरावांनीं घरांत देऊन ठेविलेली होती. आणि तशी ती त्यांनीं दिली नसती तरीहि पोपटच्या गोड स्वभावामुळें त्याला वेगळी वागणूक देण्याचा विचारहि घरांतल्या मंडळींच्या मनाला शिवला नसता.

पोपटला काय हवं नको तें पाहण्याचं काम घरांत मुलांकडेच असे. त्यांतल्या त्यांत परकऱ्या सुलभेला त्याच्याबद्दल फार कुतुहल आणि आपुलकी वाटायची. पोपट लुगडं नेसतो आणि नाचतो या गोष्टीचं तिला फार कौतुक वाटायचं. लुगडं नेसलेला पोपट दिसतो तरी कसा हें पाहण्याची दुर्दम्य इच्छा, ही गोष्ट तिला समजून आल्यावर झाली होती. आणि एक दिवस तिनं ती पूर्ण करून घेतलीहि.

रंगमहालांत पोपट लुगडं नेसून नाचतो हें तिला माहित होतं. एक दिवस असाच कार्यक्रम तिथं चालू असता सुलभा हळूंच सर्वांचा डोळा चुकवून माडीवर गेली होती. माडीला लागूनच रंगमहालाचं माळवद होतं. माळवदाला उजेडासाठीं झरोके होते. पाय न वाजविता ती माळवदावर आली व एका धाऱ्यातून डोकावून पाहूं लागली.

खाली गॅसबत्तीचा लख्ख प्रकाश पडला होता. गांवांतली दहा-वीस मंडळी ऐसपैस बसलेली होती. कुणीतरी तुणतुणं घेतलेलं होतं. एकजण ढोलकी वाजवीत होता. बापूसाहेबांनी-सुलभेच्या वडिलांनी डफासारखं कांहींतरी हातीं घेतलेलं होतं आणि पोपट त्या सर्वांच्या मध्यभागीं नाचत होता. हिरवं लुगडं तो नेसलेला होता. केसांचा सैलसा अंबाडा घालून त्यांत त्यानं वेणी माळली होती. गळ्यांत वज्रटीक आणि पुतळ्यांची माळ होती. नाकांतली नथ त्याला फार खुलून दिसत होती. अगोदर माहीत नसतं तर ही स्त्री







अनुक्रमणिका

म्हणजे एक पुरुषच आहे यावर तिचा विश्वास बसला नसता इतका स्त्रीवेष पोपटला हुबेहूब शोभत होता. वक्षस्थळाचा डौलहि त्यानं सही सही आणला होता. आणि त्याचं तर मोठंच आश्चर्य सुलभेला वाटलं होतं.

मागेपुढें आणि गरागरा पोपट नाचत होता. माना आणि डोळे मोडीत होता. लचकत होता आणि गालांतल्या गालांत हंसत होता. गाण्याचं एकच कडवं तो घोळघोळून म्हणत होता. आणि ढोलकीवाला, तुणतुणेवाला आणि तिचे वडीलहि त्याच गाण्याची री ओढीत होते.

फेडीन लुगडी, करीन उघडी
बळंच ××× नारी तुला ग ऽऽऽ...जी. जी. जी.

तारस्वरानं या कडव्याचं गायन चालू होतं. आपल्या वडिलांनीहि कानावर हात ठेवून व हात लांब करून हें गाणं म्हणावं हें सुलभेला कससंच वाटलं. नेहमीं गंभीर आणि उग्र वाटणारे आपले बापूसाहेब असं काहीं करतात हें जर कुणी तिला सांगितल असतं तर सांगणाऱ्या माणसाचा तिला राग आला असता. ती व्यक्ति कांहींतरीच सांगते असं तिला वाटलं असतं.

पण आतां प्रत्यक्षच ती पहात होती. आपल्या आईचं आणि वडिलांचं जमत का नाहीं, त्यांचीं भांडणं का होतात हें तिला आतापर्यंत फारसं उलगडलं नव्हतं. त्याचाहि अंधुक उलगडा तिला आतां होऊं लागला होता.

—हो हो हो ऽऽऽ
बापूसाहेबानी हात वर केले.
झांजा, ढोलकी, तुणतुणं क्षणभर विसावलं.
'अगे ए द्रौपदी' बापूसाहेब म्हणत होते.
'होय' मुरकत पुढें सरून पोपट उद्गारला,

'तूं आतां आमची दासी झालीस आहेस....हे पांच पांडव तुला द्युतांत हरले आहेत. आमच्या म्हणण्याप्रमाणें तूं वागलं पाहिजे आहेस.'

'समस्त सभाजनहो! हा दुःशासन काय म्हणतो तें ऐका. तुम्हालाबी हें मान्य आहे काय?' पोपट पायांतले चाळ खुळखुळवीत आणि मागेपुढें सरत हातवारे करीत हें म्हणत होता. तो थोडा वेळ थांबला व पुढें बोलूं लागला.

'काय. सारी सभा तटस्थ...हाय हाय...येथें न्याय उरला नाहीं काय? स्त्रीची लाज राखणारा कुणी इथं नाहीं काय?'

'ए द्रौपदी वटवट बंद कर. दासीला कसली आली आहे लाज.' बापूसाहेब पुढें झाले होते. 'अग...' त्यांनी कानावर हात ठेवला आणि तेंच गाण्याचं पालुपद त्यांनी पुन्हा सुरूं केलं. तार स्वरानं, ढोलकीच्या बोलांनी आणि तुणतुण्याच्या आणि झांजांच्या झणझणाटानं सारा रंगमहाल दुमदुमून गेला.

आणि पोपट पुन्हा पिसं भरल्यासारखा, वारं भरल्यासारखा बेभान नाचूं लागला. वाहवा वाहवा असे उद्गार मधूनच उमटूं लागले. सारं वातावरण धुंद झालं.

या धुंदीतच सुलभा किती वेळ रमली असती कोण जाणे! पोपटवर तिचं लक्ष खिळून गेलं होतं....पण तितक्यात तिच्या पायाशीं कांहीं खुळबुळलं. ती घाबरली. किंचाळली आणि माळवदावरून तिनं धूम ठोकली.

× × ×




हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं-जित्वा वा भोक्ष्यसे महिम्॥
तस्मात् उत्तिष्ठ कौंतेय युध्दाय कृतनिश्चयः॥ गी. २।३७

हे भारता, युद्धासाठीं कृतनिश्चय असा तूं दंड ठोकून रणांत उभा राहिलास. तत्त्वज्ञानाच्या भाषेचा फुलोरा झाडून टाकून तूं आपली व्यवसायात्मक अशी बुध्दि कार्याकार्याच्या विचारानंतर शस्त्रांच्या खणखणाटावर निश्चित केलीस. भगवंतांचा देवदत्त दणाणला. तूं आपला पांचजन्य घुमविलास. यशवंत असें रणशिंग हिमालयाच्या शिखरापलिकडे शत्रूला धडकी भरवीत आपला महानिनाद करतें झालें.

भारता, चकोराच्या पिलांना चारा बालवयाचा असतो आणि सापाच्या पिलाला बडगा दाखवावयाचा असतो. आत्मिक उन्नतीचा मार्ग दाखवूं शकणारें तत्त्वज्ञान हें राजकारणाच्या व्यवहारांत फसवें ठरतें. महाबलवान सिंह तत्वज्ञानी झाल्यास कोल्हाहि त्याच्या शिरावर बसतो असें महाभारत म्हणतें.

**'व्रजंति ते मूढधियः पराभवं—भवन्ति मायाविषु ये न मायिनः'॥ कि. १।४०**

असा आदेश देणारा भारवि म्हणतो कीं भाग्यशाली भविष्याचा मार्ग चालणारें शहाणे ठकाशी ठक आणि महाठकाशी महाठक असाच रोखठोक व्यवहार ठेवतात. **'मायाचारो मायया बाधितव्यः'**॥ मायावी पुरुषांशीं जशास तसें वर्तन हाच धर्म असें महाभारत म्हणतें. **'त्वं अनवद्य मायिनं वृत्रं'॥ ऋग्वेद १०।१४७।२** अशा शब्दांनी ढोंगी लोकांस बडगा दाखविण्याचा पाठपुरावा प्रत्यक्ष वेदानं केला आहे.

**'धटासी पाहिजे धट। उद्धटाशी उद्धट
खटनटासी खटनट। अवश्य करी॥
हुंब्याशी हुंबा लावून द्यावा। टोणप्यास टोणपा आणावा
लौंदापुढें करावा॥ दुसरा लौंद॥ दासबोध १९।९।२९-३०॥**

असा उपदेश समर्थ राजकारण करणाऱ्या शिवाजीला रामदास स्वामींनीं केला आहे. आततायी असेल त्याला दंडबळानेंच ठोकरावें असा आदेश वशिष्ठ स्मृति (३-१६) मनुस्मृति (८-३५०) आणि भगवद्गीता यानीं तुला दिला आहे. युगानुयुगें रक्तात मुरलेला हा उपदेश तुला आयत्यावेळीं आतां कामाला आला आहे. हृदयांनी

दाखविलेला मार्ग चोखाळावयास सिद्धहस्त असा तूं आतां उज्ज्वल भविष्याची वाट चालत आहेस.

भारता, हा उपदेश तुला स्मरला; कांहीं प्रसंग असे असतात कीं तेव्हां तृतीय नेत्र उघडावा लागतो हें तुला पटलें; तूं दंड ठोकून रणांत उडी घेतलीस आणि रक्ताच्या अभिषेकानें रणचंडीची पाद्यपूजा केलीस; आईच्या अब्रूची चाड तुला आहे हें तूं दाखवून दिलेस; त्यावरून तुझी शांती सत्प्रवृत्त सज्जनाची होती; निमूक षंढाची नव्हती; दुर्दम्य अशा पौरुषाचा भरघोस वारसा तुला लाभलेला आहे; हें आतां खलांना कळून आलें आहे. तुझ्या उगारलेल्या खड्गहस्तानें शत्रूचे अंदाज चुकविले आहेत. आपल्या नरडीचा घोट घेतल्याशिवाय हें खड्ग आतां आंखडलें जाणार नाहीं अशा खात्रीनें आतां चांडाळ चिनी लटपटला आहे. भगवंताचें उचललेलें हें यशवंत पाऊल आपल्या सहस्र मस्तकांचा पुरा चेंदा करणार हें कपटी कालियाला पुरें पटलें आहे. आतां हा कालिया तुला नाना ढंगांनीं भुलविण्याचा प्रयत्न करील. तुला गोत्यांत आणण्यासाठीं नाना नाटकें करील.

या नाटकांचा उद्देश एकच आहे. तुझा मूळपिंड तत्वज्ञानाचा आहे. या पिंडाला चेतवून, संहार, संकर, हिंसा, रक्तपात, असल्या गोष्टींच्या तात्विक गोंधळांत तुला गुंतवावें, त्यानें बुद्धिभेद होऊन तुला मार्ग दिसेनासा झाला,

**देखें देह कांपत । तोंड असे कोरडें होत ॥**
**विकलता उपजत । गात्रांसी ॥**
**सर्वांगा कांटाळा आला । अति संतापु उपनला ।**
**तेथ वेंबळ हात् गेला । गांडिवाचा ॥ ज्ञानेश्वरी १ । १९६-१९७ ।** अशी तुझी अवस्था झाली कीं तुझा घात करावयाचा असा तो उद्देश आहे.

म्हणून भारता, आतां हें विसरूं नकोस कीं भारताचें खड्ग एकदां सकारण उपसलें गेलें कीं तें यशस्वी झाल्यावरच विराम पावतें. श्रीरामांचा शर एकदां सुटला कीं तो शत्रूला कंठस्नान घालतोच घालतो. भगवंताचें यशवंत सुदर्शन एकदां दुर्वास मागें लागलें कीं तें दुर्वासाला धुळींत लोळविते. भारता, आतां खड्ग उगारलें आहे हें पूर्ण विजय झाल्यावरच मिटावयाचें. रणोचित कठोरता एकदां उद्घोषिली आहे तिची सांगता आपणास उचित अशा रणांत घडवूनच करावयाची. भगवंत अर्जुनास म्हणतात, एकदां रणास आरंभ झाल्यावर त्यांतून उपरत व्हावयाचा क्षण हा शत्रूचा कंठनाल चिरल्यावरच असतो. भारता, कृतनिश्चय आहे तो आतां दृढनिश्चय व्हावयास हवा. शत्रूच्या फसव्या हुलकावण्यांनीं त्याची बैठक ढळतां नये; नाहीं तर तूं संतपणाच्या मोहांत पडशील आणि मग,

**'हे म्हणतील गेला रे गेला । अर्जुनु आपणा बिहाला ॥ ज्ञा. २ ॥ २०८ ॥** अशा नामुष्कींत त्या संतपणाची परिणती होईल. म्हणून भारता तुला हें ध्यानांत धरावयास हवें कीं ही वैऱ्याची रात्र आहे. हें तूं विसरतां नये कीं सापाची उचललेली फणा ठेंचून होईपर्यंत सावध असा कोप ज्वलंत राखणें हाच इतिहासाचा तुला धडा आहे.

—उपाकान्त

●●●

आणि मग अशाच चोरून, माळवदावरून रंगमहालांतल्या मैफली पाहण्याचा सुलभाला नादच लागला. पोपटकडे पाहण्याचा दृष्टिकोन बदलूं लागला. ती साडी नेसूं लागली आणि अंगोपागांनीं भरूं लागली तेव्हां पोपटबद्दल तिला वेगळंच कांहीं वाटूं लागलं. ती त्याच्या खाण्या-पिण्याची अधिक आस्थेनं काळजी घेऊं लागली. भलती सलती स्वप्नं ती पाहूं लागलीं.

परंतु घरांतल्या कडव्या शिस्तीमुळें व बदलीमुळें तिला आपल्या या भावना मनाच्या कप्प्यांतच बंदिस्त करून ठेवाव्या लागत होत्या. पोपटच्या वागण्यांत फरक नव्हता. सर्वांशींच तो खेळीमेळीनं वागत असे. तो नेहमीच हंसतमुख असे त्यामुळें त्याच मन समजणं कठीण होतं.

एक दिवस बापूसाहेब परगावी गेले होते. दुपारची वेळ, सर्वत्र सामसूम होती. मुलं शाळेंत गेली होती. म्हातारी माजघरांत डुलकी काढीत होती. आई स्वयंपाक घरांतच लवंडली होती. अजून पोपट जेवणासाठीं आला नव्हता. तो आला तर वाढ अशी सूचना सुलभेच्या आईनं तिला देऊन ठेवली होती. नेहमीं जाग्रण करावं लागत असल्यानं दुपारच्या जेवणाच्या बाबतींत नियमितपणा ठेवणं पोपटाला जमत नसे. आणि बापूसाहेब घरीं नसले म्हणजे तर थोडी जास्तीच मोकळीक तो स्वतःला घेत असे. त्या दिवशींहि तोच प्रकार घडला होता.

आतुरतेनं सुलभा त्याची वाट पाहूं लागली. देवाला नवस बोलूं लागली. आणि तेवढ्यांत पोपट आला.

'किती रे उशीर केलास ?' सोप्यांतच सुलभेनं त्याला हटकलं.

'नींद उघडानाच सिंची' पोपट थोडा अपराध्यागत उत्तरला.

'जेवणार ना ?' तिनं प्रेमळपणं विचारलं.

'कावळं कोकलूं लागल्यात पोटांत बघा.' पोपट उत्तरला.

'हे बघ इकडे तिकडे पाहून हळूंच म्हणाली, 'माडीवर चल. मला तो उंच कोनाड्यांतला डबा काढून हवा. वाढतेच मग.'

अशीं कामं घरांत पोपट नेहमींच करायचा. तो तिच्याबरोबर माडीवर गेला. माडी रिकामीच होती.

'कोणता डबा सुलभाताय ?' त्यानं विचारलं.

पण सुलभानं काहींच उत्तर दिलं नाहीं. एक टक ती त्याच्याकडे पाहूं लागली.

'सांगाना ?' त्यानं पुन्हा विचारलं.

'पोपट' डोळ्यांत सर्व भावना आणून सुलभा उद्गारली. त्याच्याकडे पाहूं लागली आणि त्याच्याहि डोक्यांत प्रकाश पडूं लागला.

'पोपट' तिनं पुन्हा त्याच्या नांवाचा उच्चार केला आणि त्याच्या गळ्याला तिनं एकदम मिठी मारली.

पोपट घाबरला. अशी कांहीं अपेक्षा त्यानं केली नव्हती. खाल्ल्या अन्नानं त्याचं मन मेलं होतं. बापूसाहेबांनीं त्याला फार चांगल्या प्रकारें वागविलं होतं. त्यांचे आपल्यावर फार उपकार आहेत असं तो मानीत होता. शिवाय त्यांच्या उग्र स्वभावाचीहि त्याला कल्पना होती.

लोक सांगत......

पोपटली नाच्या म्हणून सालाच्या बोलीनं ठेवण्यापूर्वीची गोष्ट. बापूसाहेबांनीं एक नाचणारी आवा आणून ठेवली होती. तिला वेगळं घर दिलं होतं आणि राणीसारखी तिची ठेप ठेविली होती. पण बाई जातीवर गेली होती. गांवांतल्याच एका माणसाबरोबर तिचे संबंध मांडले









## आपल्या भविष्यांतील उज्ज्वल तारा!

एक सामान्य ट्रक ड्रायव्हर, पण बाबूलाल मोठा दूरदर्शी! मालकाचाच कित्ता त्यानं पुढं ठेवला. काटकसर करून ट्रक घेण्यापुरते पैसे जमविले आणि लवकरच आपला पहिला टाटा मर्सिडीज बेन्झ ट्रक त्यानं खरेदी केला.

आणि तो त्रिदल शुभतारा बाबूलालच्या आयुष्यांत उगवला, त्या दिवसापासूनच त्याच्या भरभराटीचीं सुचिन्हें दिसूं लागलीं. थोड्याच अवधींत नव्या कॉलनींत बाबूलालचें एक टुमदार घर उभें झालें. मुलांना उत्तम शिक्षण-त्यांच्या प्रकृतीची उत्तम काळजी,—सर्व सुखें त्याच्या पायाशीं खेळूं लागलीं.

आज बाबूलालच्या टी.एम्.बी. ट्रक्सच्या ताफ्यांतून लक्ष्मीचा अविरत वावर चालू आहे. आणि यापुढेंहि अनेक वर्षांनंतर देखील ते त्याच्या मुलांबाळांकरितां अशीच बहुमोल कामगिरी बजावित राहतील.



भाग्यराशीचा तारा

वाहतुक व्यवसायांतील अधिकाधिक लोक टाटा मर्सिडीज बेन्झ ताऱ्यालाच आज ध्रुवताऱ्याचा मान देऊं लागल्यास त्यांत कांहीं नवल आहे काय?

# टाटा
# मर्सिडीज - बेन्झ

**टाटा इंजिनिअरींग अँड लोकोमोटिव्ह कंपनी लिमिटेड**

सेल्स ऑफिस: १४८ महात्मा गांधी रोड, मुंबई १.





**जय जवान !** (तुम्हींहि केव्हां केव्हां हंसवतां!)



## कर्तव्यदक्ष

दोन जवान एका राहुटींत रहात असत. रात्रीं कांहीं केल्या एका जवानाला झोप येत नसे. तो फारच कर्तव्यदक्ष म्हणून प्रसिद्ध होता. दुसरा मात्र ढाराढूर झोपत असे. हें पाहून एके रात्रीं त्या जवानाला त्या कर्तव्यदक्ष जवानानें विचारलें, ' तुला कशी चांगली झोप लागते. मला कां नाहीं लागत ? ' ह्यावर त्या जवानानें त्याला उपाय सुचवला, ' हे बघ, त्या समोरच्या कचऱ्याच्या टोपलीवर लक्ष केंद्रित कर. तुला लगेच झोप लागेल.' ह्याप्रमाणें करतांच त्या जवानाला खरंच झोप लागली. पण थोड्या वेळानें तो उठला हें पाहून त्या जवानानें त्याला विचारलें, ' कां उठलास ? झोप लागली ना ? '

तो कर्तव्यदक्ष जवान उत्तरला, ' झोप लागली पण झोपेंत ती टोपली कचऱ्यानें भरलेली दिसली म्हणून रिकामी करण्यासाठीं उठलों ! '

## सांवळागोंधळ

भारतीय सैन्यदलांत घडलेली ही गोष्ट. रात्रभर आघाडी सांभाळून जवान थकले होते. पहांटे पाळी संपल्यावर जवान झोपून गेले. त्याच तंबूंत कर्नलसाहेबही झोपले होते. इतक्यांत कोणाच्या तरी कण्हण्याचा आवाज ऐकून दोन-तीन जवान जागे झाले. पहातात तो खुद्द कर्नलसाहेबच कण्हत आहेत. सगळे कर्नलसाहेबां-भोंवती गोळा झाले; तेव्हां कण्हत कण्हत कर्नलसाहेब म्हणाले, ' जा, त्वरा करा. लवकर डॉक्टरांना बोलावून आणा. कंबरेपासून खालच्या भागाला ' पॅरॅलेसीस ' ( पक्षघात ) झालाय मला. ' कर्नल-साहेब तर पुरते घाबरले होते.त्यांच्या कपाळावर घाम ओसंडत होता.

कांहीं जवान त्यांचा घाम पुसूं लागले व त्यांना वारा घालूं लागले तर एक-दोघे डॉक्टरांना बोलवायला गेले. डॉक्टर आल्या-वर त्यांनीं कर्नलसाहेबांना तपासायला सुरुवात केली. प्रथम छाती तपासली. मग कर्नलसाहेबांच्या अंगावरील पांघरूण काढून ते कंबरेखालचा भाग तपासूं लागले. त्यांच्या चेहऱ्यावर क्षणोक्षणीं भाव बदलत होते. ते बदलते भाव पाहून जवान घाबरून गेले. तपासणी झाल्यावर डॉक्टर जवानांना म्हणाले—

' घाबरण्याचं कारण नाहीं. चुकून कर्नलसाहेबांनीं दोन्ही पाय लेंग्याच्या एका पायांत घातले आहेत ! ! '

## बर्फ उकळून प्या !

पाणी दूषित झाल्यामुळें जर्मनीमध्यें टायफॉइडची साथ पसरली होती. त्यामुळें सैन्यांत पाणी उकळून पिण्याची सूचना करण्यांत आली होती व पाण्यासंबंधी अन्य अनेक हुकूम होते. त्यामध्यें एक हुकूम होता- ' बर्फाच्या लाद्या वापरण्यापूर्वी उकळून घ्याव्यात ! '

होते. चोरून हें सारं चालू होतं. बापूसाहेबांना जेव्हां हें समजलं, तेव्हां त्यांनी तिच्यावर नजर ठेवली.एका रात्रीं त्यांनी तिला पुराव्यानिशी पकडली. बाप्या तेवढ्यांत निसटला. बापूसाहेबांनीं उभ्या बाईवर घासतेलाची बाटली उपडी केली. स्टैर बाऱ्यामुळं काडी कांहीं लौकर पेटली नाहीं. बाई अंगावरचं सोडून बाहेर पळाली. ती पुन्हां पांगरींत दिसलीच नाहीं.

अशा स्वभावाच्या बापूसाहेबांच्या खुद्द मुलीशीं प्रेमसंबंध म्हणजे विस्तवाला कवटाळण्याचाच तो प्रकार ठरला असता.

' सुलभाताय-नको... थोरामोठ्यांची लेक तुम्ही ' पोपटनं तिला दूर लोटलं.

' माझं तुझ्यावर प्रेम आहे ' सुलभा पुटपुटली आणि त्याला अधिकच बिलगली. ' चल आपण कुठं दूर जाऊं ' ती म्हणाली.

तेवढ्यांत खालीं कांहीं आवाज झाला. दोघेही एकमेकांपासून दूर झाले. खाली आले. निमूटपणें सुलभेनं त्याला जेवायला वाढलं.

× × ×

त्या प्रसंगानंतर दोघांचीहि भीड बरीच चेपली होती. सुलभेचं पोपटलाहि वेड लागल्याचीं लक्षणं दिसूं लागलीं होतीं. हा थोरामोठ्यांचा वरचा सोन्याचा घास आपल्याला चावणार नाहीं ही जाणीव पोपटला अस्वस्थ करीत होती, तर बेभान तारुण्यानं सुलभेच्या डोळ्यावर पूर्ण झांपड आली होती.

पण कांहीं अधिक उणा प्रकार घडण्यापूर्वीच किंवा गवगवा होण्यापूर्वीच सुलभेचं लग्न ठरलं. झटपट वाटाघाटी झाल्या. शुभमंगल झालं आणि ती आपल्या सासरीहि रवाना झाली.

तिला खूप वाईट वाटलं. लग्नाच्या गडबडींत घर इतकं भरलं होतं कीं पोपटची ती एकांतात भेटहि घेऊं शकली नव्हती. आणि नंतर माहेरपणासाठीं जेव्हां ती पांगरीला आली होती तेव्हां पोपट नोकरी सोडून मिलिटरींत भरती झाल्याच तिला समजून आलं होतं.

तथापि पोपटबद्दलच्या आठवणी मात्र सुलभा विसरूं शकली नाहीं. माधवरावाशीं लग्न झाल्यावर त्याच्या संसारांत एकरूप होत असताच हा आठवणींचा धागाहि तसाच ओढला जात होता. लग्ना-नंतर माधवरावाची सतत बढतीच्या जागींच नेमणूक होत गेली. युद्धाचा काळ असल्यानें जुन्या लोकांना भराभर वरच्या जागा मिळत गेल्या. कारकुनाचे ते हेडक्लार्क व हेडक्लार्कचे मामलेदार झाले. सेक्रेटरीएटमध्यें ते बदलून गेले व तेथून पुन्हा जिल्ह्यांत मोठमोठ्या जागावर त्यांच्या नेमणुका होत गेल्या.

हा सारा सुलभाचा पायगूण ते समजत. या बदलत्या वातावरणा-नुसार सुलभाहि बदलत गेली होती. आपल्या आई-वडिलांचा विसवादी संसार तिनं पाहिला होता. आणि तोच प्रकार आपल्याहि आयुष्याचा होऊं नये असें तिला वाटे. पुरुषांना काहीं काहीं वेळेला काय हवं असतं याची जाणीव तिनं चोरून पाहिलेल्या पोपटच्या स्त्री भूमिकांतून घेतली होती. ती तिला उपयोगी पडत होती.

आपल्या संसारात पूर्ण सुखी असूनहि सुलभेला क्वचित वाटे, पोपटबरोबर आपला संसार काहीं वेगळाच झाला असता. तो कसा झाला असता याची तिला कल्पना करता येत नसे. पण ती जीं चित्रें या संबंधांत पाही ती मात्र फार फार रम्य असत.






आणि त्याच चित्रांपैकीं एक चित्र ती आतां या क्षणीं पहात होती. हो हो हो ऽऽऽ

या परिचित ललकारीनं ती भानावर आली.

रंगमंचावर नमनाचं पद संपलं होतं आणि तमाशांतील एका एका कलावंताचा परिचय करून देण्यांत येत होता.

गाल बसलेला, शरीर सुक्कड झालेला आणि निबरट वाटणारा एक माणूस पुढं ढकलण्यांत आला.

'हे पोपटराव रुईकर' माईक बोलूं लागला.

कान टवकारून सुलभा ऐकूं लागली. पोपटचं तें नांव होतं. पण दिसणारी व्यक्ति व तिनं पाहिलेला पोपट यांत जिवंत माणूस व प्रेत इतकं अंतर होतं. कदाचित त्याच नांवाचा हा दुसरा माणूस तर नसेल ?

'लहानपणापासून यांना तमाशाचा नाद आहे. आतांपर्यंतची सारी हयात तमाशांत गेली आहे. पांगरकराकडे यांनी नाच्या म्हणून पुष्कळ वर्सं काम केलं. दोन वर्सं मिलीटरींत काढली नि पुना तमाशांत आले. चैन पडेना त्यांना तिथं. सोंगाड्याच्या कामांत एकदम हातखंडा.'

माईक थांबला. शंकाच नको. पोपटच तो. सुलभेला वाटलं उगीचच आलों आपण इथं. आपल्या रम्य सुंदर चित्रावर माईकनं सांडलेली शाई तिला पाहवेना. या चित्रांतली आपली छबी जेव्हां ती कल्पनेनं चितारूं लागली तेव्हां ती अस्वस्थ झाली, घामाघूम झाली आणि घर्मबिन्दु ती रुमालानं टिपूं लागली. एका अदृश्य, अनामिक आणि अकारण दुःखानं आपण अस कळवळून का जात आहोंत हेंहि तिला समजेना. तिला वाटल आपण अंतःकरणांत जोपासलेल्या सुंदर चित्रावर अशी शाई सांडायला नको होती.

•••



जय जवान :—

(तुम्हींहि केव्हां केव्हां हंसवतां !)

## निळे डोळे

बिल्ल्यांच्या रंगावरून हुद्दा कसा ओळखावा ? ह्याबाबत स्त्री-सैनिकांना एक स्त्री-अधिकारी माहिती देत होती. इतक्यांत आकस्मातपणें एका अधिकाऱ्यानें त्या वर्गाला भेट दिली. त्याच्या बिल्ल्यावरून तो ॲडमीरल आहे हे कोणींही सांगितलें असतं. तो निघून गेल्यावर त्या स्त्री-अधिकाऱ्यानें त्या स्त्री सैनिकांना विचारलें, 'हं, आतां सांगा पाहूं. ह्या अधिकाऱ्याचा हुद्दा कुठला होता तो ?' परंतु प्रत्येकीचीं उत्तरें एकाहून एक विभिन्न होती, त्यामुळें ती स्त्री अधिकारी चिडून म्हणाली, 'हाच जर कोणी तरुण अधिकारी असता तर त्याच्या डोळ्यांचा रंगही तुम्हीं बिनचूक पाहिला असता व लक्षांत ठेवला असता !'

पाठीमागून एक स्त्री-सैनिका उत्तरली, 'मघाच्या अधिकाऱ्याच्या डोळ्यांचा रंग निळा होता.'

## बहाद्दर जवान !

शरीरांत असलेल्या कृत्रिम अवयवाचें महत्व एक सेनाधिकारी जवानांना पटवून देत होता. 'कृत्रिम अवयवामुळें बिल्कुल निराश होण्याचें कारण नाहीं. उलट असं अवयव असलेल्या जवानांचं शत्रुसैन्यांत चांगलं फावतं. मला काय सांगायचं आहे ते मी तुम्हाला स्पष्ट करून दाखवतो.' असं म्हणून एक पाय कृत्रिम असलेल्या एका जवानाला त्यानें पुढें बोलावलें. 'हा जवान पहा. ह्याचा एक पाय लांकडाचा आहे. मी त्या पायावर कितीही छड्या मारल्या तरी ह्याला कांहीं होणार नाहीं,' व लगोलग त्यानें त्या पायावर सपासप छड्या मारण्यास सुरुवात केली. एक...दोन...जवळ जवळ शंभर छड्या त्यानें मारल्या पण त्या जवानानें हूं कीं चूं केलें नाहीं. हें पाहून तो अधिकारी हंसून म्हणाला, 'पाहिलंत. कांहीं झालं नाहीं ह्याला;' आणि लगेच तो अधिकारी बाहेर आला. त्याच्या पाठोपाठ तो लाकडी पाय असलेला जवानही बाहेर आला व पाय चोळूं लागला.. 'काय रे काय झालें ?' त्याला पाय चोळतांनां पाहून त्या अधिकाऱ्यानें विचारलें.

पाय चोळत तो उत्तरला, तुम्ही चुकून चांगल्या पायावर छडीमार केला साहेब !

## सवाल तसा जबाब

अमेरिकन सैन्यदलाची पाहणी करीत असतांना रशियाचे पंतप्रधान क्रुश्चेव्ह ह्यांनी एका जवान अधिकाऱ्याला विचारलें, 'रशियाविरुद्ध युद्ध करण्यासाठीं उत्तेजन देणारा तूं एक अधिकारी आहेस ना ?' हें ऐकून तो अधिकारी ताडकन् उत्तरला, 'आणि अमेरिकेवर हल्ला चढविण्यासाठीं टपून बसलेले क्रुश्चेव्ह आपणच ना ?'





*स्वतंत्र सार्वभौम भारतानें नाईलाजानें दुसऱ्या एका स्वतंत्र राष्ट्राशीं म्हणजे पुर्तुगेजांशीं पहिला सामना दिला. शांतताप्रिय भारतीय जवानांच्या शौर्याचा गोमंतकीयांना व भारतीयांना झालेला हा साक्षात्कार.*

# शांता झाली दुर्गा रे



—प्रभाकर श्रीधर नेरुरकर

१७ डिसेंबर १९६१ ची रात्र. चांदणं स्वच्छ टिपूर पडलं होतं. वसिष्ठांनी अरुंधतीला म्हटल्याप्रमाणें ' विश्वामित्राच्या तपश्चर्येसारखं. वातावरणांत एकप्रकारचा तांबसर धूसरपणा आकाशाच्या सोनेरी शुभ्र पार्श्वभूमिवर सौम्यता व उग्रता यांनं शामक अन् दाहक पण...असं अपूर्व रंग रेखाटन करीत होता. गोमंतकांतील स्वातंत्र्यपिपासु जनतेची आकांक्षा फलद्रूप होण्याचा क्षण जवळ येत होता–राण्यांपासून तो रिबेलोपर्यंत गोमंतकाच्या मुक्तीसाठीं देशोधडीला लागलेल्या व आत्मबलिदान केलेल्या अनंत हुतात्म्यांच्या उग्र स्वातंत्र्य–साधनेला सफलता प्राप्त होण्याची वेळ अटळ टरली होती. अखेरचा एकांडा शिलेदार व येशूचा सच्चा अनुयायी मार्क फर्नाण्डीस अन् त्याचा एकनिष्ठ साथीदार वसंत मांद्रेकर यांच्यावरील आग्वाद किल्ल्यांतील अमानुष पोर्तुगिजी अत्याचारांतून रानटी पोर्तुगीज सत्तेचा अंतिम क्षण आतां कांहीं मोजक्या क्षणांचाच प्रश्न उरला होता. वेळ मध्यरात्रीची होती पण रात्र मध्यावर आल्यासारखं कोणतंच कृष्णचिन्ह कुठेंच आढळांत येत नव्हतं. गोव्याच्या सरहद्दीवर सारे कांहीं जय्यत होते आणि आठवडाभरे लष्करी कारवाईची वाट पाहून कंटाळलेली सरहद्दीवरील भारतीय जनता झोपी गेली होती. इतक्यांत लष्करी हुकूम झाला. भारतीय सैन्याचं संचलन गोव्याच्या दिशेनं सुरू झाले. तोफा ' धडम् ' ' धुड्डम ' करूं लागल्या. आकाशांत विमानें ससाण्यासारखी झेंप घेऊं लागली. ' होणार होणार ' म्हणून गाजत असलेली लष्करी कारवाई सुरू झाली. एका पाशवी सार्वभौम पाश्चात्य सत्तेशीं अन् तिच्या सैनिकांशीं भारतीय जवान मुकाबला करूं लागले. शिशुपालाचे शंभर अपराध पोटांत घातल्यानंतर भगवान् श्रीकृष्णानें आपलें सुदर्शन चक्र सात्विक संतापानें हवेंत सोडलें होतें. सरहद्दीवरील आणि सरहद्दीपलिकडील जनतेची झोप खाडकन् उडाली...

पोर्तुगीज सैनिकाला तर कित्येक दिवस झोप येतच होती कुठें ! त्याची झोप भारत सरकारच्या नव्या ठाम धोरणामुळें केव्हांच उडाली होती.

असं असूनहि पोर्तुगीज सामर्थ्याच्या प्रचंडपणाच्या अतिप्रचंड वल्गना गोव्याच्या भूमीवरून केल्या जात होत्या. अग्न्यस्त्रफेंकी विमानतळ गोव्यांत बांधण्यांत आल्याची अफवा पसरली होती. मित्र राष्ट्रांची मदत पाण्यांतून, हवेंतून अन् पाण्याखालून सुद्धां तुफान वेगानें अन् पुरेपूर येत असल्याची घोषणा बरोबर घुमत होती. ' अल्बुकर्क ' ही लढाऊ नौका पोर्तुगिजांनी सज्ज ठेवली होती. अंजदीव बेटावर पोर्तुगिजांचा नाविकी तळ तयारींत राहिला होता. युद्ध झालेंच तर सारें गोवेंच भस्मिभूत करण्याच्या भीषण धमक्या पोर्तुगीज़ आपल्या नभोवाणीवरून नभाला भिडणाऱ्या गर्जना करून सतत देतच होते. सीमेवर आतंक सुरूं होईल, घबराट माजेल व पळापळी सुरूं होईल अशीं चिन्हें दिसत होतीं.

मी हें सारं जवळून पहात होतो. बावन्न सालापासून सतत नऊ वर्षे मी सरहद्दीवर काढली होती. अनेक नात्यांनी गोमंतकीय राष्ट्रवाद्यांशीं माझा घनिष्ठ संबंध आला होता. त्यांचं कार्य हें माझं कार्य मी मानलेलें होतं अन् मी तसा गोमंतकीय नसूनहि गोव्याच्या मुक्तिकार्यांतील एक नम्र सेवक, सैनिक व सहकारी बनलो होतो.

मी १९५४ सालीं लक्करकोटवरून गोव्यांत शांतिमय प्रवेश करणारा सत्याग्रही मार्क फर्नाण्डिस व त्याचे साथीदार यांना पाहिलं होतं. तो लढा अयशस्वी झालेला मी पाहिला. १९५५ सालचं लक्करकोटवरील भारतीय सत्याग्रहाचे पोर्तुगीज लष्करीशाहीनं केलेलं भीषण हत्याकांड मी दिवसाउजेडी न्याहाळलं होतं. सहोदरा रॉय या भारतीय स्त्रीनें केलेला राणी लक्ष्मीच्या तोडीचा अहिंसक पराक्रम पण मी डोळ्यांत रक्त आणून पाहिला होता. निःशस्त्र शांततावादी सत्याग्रह्यांवर आराम खुर्चींत ऐसपेस बसून गोळी चालविणाऱ्या पोर्तुगीज सैनिकांना पाहतांना संतप्त झालेला भारतीय अधिकारी खवळून गेलेला पण तितकाच असहाय्य होऊन खालीं हताशपणें कोसळलेला पण मी पाहिला होता. त्याचे ते दुबळे पण आवेशपूर्ण उद्गार अजूनहि माझ्या कानांत घुमतात. तो म्हणाला होता...' My hand goes to my trigger and yet I cannot shoot ' आणि एक जगविख्यात कीर्तीचा गांधीवादी अमेरिकन वार्ताहर आपला कॅमेरा फेंकून देऊन त्याच लक्करकोटला ' Enough with this Camera, give me a gun...' असं अकांडतांडव करतांना मीच पाहिला होता. पत्रादेवीवर मानवी रक्ताचा सडा पडला होता. आणि त्यांत स्त्रीचं रक्तसुद्धां मिसळून गेल होतं...

तरीहि कुठेंच कांहीं घडलं नव्हतं. गोवा विमोचनाचा क्षण जवळ न येतां दूर दूर जात आहे कीं काय असं वाटण्याइतकं नैराश्य स्वातंत्र्य-वाद्यांना छळीत होतं. पोर्तुगीज फॅसिस्ट सत्तेला सत्याचा साक्षात्कार होऊं शकत नाहीं; शक्तीचाच होतो, हें पुनः एकदां सिद्ध झालं होतं. म्हणूनच एके दिवशीं भारतीय जवान गोवा सरहद्दीवर उभा ठाकला. तो महिना डिसेंबर होता. तें वर्ष १९६१ हें होतं.

भारतीय सेना ही मुक्तिसेना म्हणून गोवा सरहद्दीवर ट्रकांतून, टॅंकमधून, विमानांतून व पायीं निरनिराळ्या दिशांतून येऊन तळ ठोकीत होती. भारतीय जवानांना सरहद्दीवरील सर्व जनता सामोरी जात होती व आत्यंतिक आत्मियतेनं व आदरानं त्यांचं स्वागत करीत होती. सुवासिनींकडून त्यांना ओवाळण्यांत येत होतं, मुलांकडून त्यांच्या कीर्तीचा जयजयकार केला जात होता, म्हाताऱ्या-कोताऱ्यांकडून त्यांच्याकडे कौतुकानं पाहिलं जात होतं. आधुनिक सैन्य कोणत्या साधनांनीं कसं लढा देतं याचं प्रात्यक्षिक प्रथमच या डोंगराळ, एकाकी, मागासलेल्या खेड्यांत जनतेला 'याचि देहीं, याचि डोळा, पहायला' मिळत होत. सह्याद्रींतील दऱ्याखोऱ्या पुनः एकदां वीरश्रीचं पाणी पिऊन जिवतपणानं जगूं लागल्या. रानावनांतून पुनः एकदां रणभेऱ्या आणि रणगर्जना मरणालाही वेडावीत मर्दुमकीला आळवूं लागल्या. त्यामुळें पोर्तुगीज सत्ताधाऱ्यांचं धाबं दणाणलं; पोर्तुगीज सैनिकांची अवस्था तर केंविलवाणी व करूण झाली.

आदल्याच दिवशीं कांहीं परदेशी व भारतीय वार्ताहरांबरोबर मला सरहद्दीवरील कित्येक मैलांचा तीनचार दिशांहून दौरा करतां आला, त्यावेळीं पोर्तुगीज ठाण्यांवरील अनेक पोर्तुगीज अधिकाऱ्यांचं व सैनिकांच मला निरीक्षण करतां आलं. एका ठाण्यावरचा पोर्तुगीज अधिकारी आजही मला आठवतो. त्याला विचारण्यांत आलं..., 'भारतानें लष्करी कारवाईची सर्व तयारी सभोंवार केली आहे. आपण काय करणार आहांत ?......'

त्याच्या चर्येवरची गेल्या कित्येक वर्षांची उर्मी उतरलेली दिसत होती; तरी सुद्धां उसन्या आवेशानं त्यानं उत्तर दिलं,

'आम्ही शेवटपर्यंत लढा देऊं...'

आणि तोंच अधिकारी सर्वांत प्रथम आपलें ठाणें सोडून पळाला होता. सर्वत्र हेंच झालं हें खरं ! पोर्तुगिजांचं पाणी पळालं खरं; पण दगाबाजीमध्यें ते नेहमी पुढेंच राहिले. मागे सरले नाहींत. जी दगलबाजी नेफामध्यें चिनी सैनिकांनीं केली तीच त्यांनी पण अल्पशः गोव्यांत केली. रक्तपातासाठीं रक्तपात हें भारतीय सेनेचं ब्रीद केव्हांच नव्हतं, आजही तें नाहीं, पुढेंही तें असणार नाहीं हें भारतीय जवानांपैकीं सर्वश्रेष्ठ सेनानींपासून तो सामान्य सैनिकापर्यंत सर्वांनीं सिध्द केलं. पण त्याचवेळीं दुष्टांच्या दुष्कृतीचं तिच्या कार्यासह समूळ निर्दालन केल्याशिवायही भारतीय लढवय्या क्षणभर विसावणार नाहीं हें पण गोव्यांतच सिद्ध झालं. दडून, शरणागतीचं सोंग करून भारतीय सैनिकांवर गोळीबार करणें, रस्त्यारस्त्यावर सुरुंग पेटवून ठेवणें, पूल उडवून देणें, मंदिरांचा आणि मठांचा दगाबाज कारवायांसाठीं निर्लज्ज उपयोग करणें, यांत पोर्तुगीज सैनिक रतिभरही चिन्यांना हार गेला नसता.

मला आठवतं, 'गोवा कमांडोस्'च्या एका शूर पथकाबरोबर मी गुप्तमार्गानें गोव्यांत प्रवेश केला होता. आम्ही ज्या रानवाटेनं चाललो होतो; रात्रीचा दुसरा वा तिसरा प्रहर सुरू झाला असावा; त्याच्या आजूबाजूनेच पोर्तुगिजांनी तयार केलेला तात्पुरता रस्ता पणजीकडे

पान २० कॉलम २ वर

कलाकृतींच्या [illegible] ?



# रूपें पालटणाऱ्या कलाकृति

अशी कल्पना करा कीं तुम्ही एखाद्या मासिकाचे संपादक आहांत आणि मासिकाच्या खास अंकाकरितां एखादी चटकदार लघुकथा मिळविण्याच्या हेतूनें तुम्ही एका सुप्रसिद्ध साहित्यिकाकडे गेला आहांत. अशावेळीं तो साहित्यिक तुम्हाला म्हणाला कीं, 'मी तुम्हाला लघुकथा देतो. पण माझ्या लघुकथेच्या आधीं आणि नंतर तुम्ही कोणच्या लघुकथा छापणार आहात आणि त्या लघुकथांचे विषय काय आहेत ते बोला. म्हणजे मग मी माझी लघुकथा लिहायला घेतों '—इतरांच्या लघुकथांचे विषय आधी कळून घेण्याची जिज्ञासा बाळगणाऱ्या अशा साहित्यिकाला तुम्ही काय म्हणाल ?

माझी खात्री आहे कीं असे साहित्यिक किंवा अशा नमत्या अगी घालणारे लोक यांना तुम्हीं 'मुलखा वेगळें' ठरवाल. पण अशा या अवलिया लोकांच्या मेळाव्यांत जमा होण्याजोगा एक महान् चित्रकार सुमारे शंभर वर्षांपूर्वीं इंग्लंडमध्यें होऊन गेला. त्या जगप्रसिद्ध चित्रकाराचें नांव —टर्नर !

इंग्लंडच्या निसर्गचित्रण पध्दतीचा जनक म्हणून टर्नरचें नांव कला इतिहासांत मशहूर आहे. लँडस्केप हा प्रकार इंग्लंडमध्यें टर्नरनें प्रथम रूढ केला. टर्नरचे लँडस्केप्स त्या काळांत इतके लोकप्रिय झाले होतें कीं टर्नरचे लँडस्केप दिवाणखान्यांत लावण्याची एक फॅशनच त्या काळांत प्रतिष्ठित घराण्यांत रूढ झाली होती. टर्नरचीं चित्रें खरेदी करण्यासाठीं गिऱ्हाइकांची गर्दी होत असे. जॉन रस्कीनसारख्या श्रेष्ठ कलासमिक्षकानें ' मॉडर्न पेंटर्स ' या आपल्या महान प्रबंधाचीं कैकतरी पानें टर्नरच्या कलाप्रतिभेची स्तुति करण्याकरितां खर्च केलीं आहेत. किंबहुना रस्कीननें टर्नरविषयीं जेवढें लिहिलें आहे तेवढें कोणत्याही लेखकानें कोणाही कलावंताबद्दल आजपर्यंत लिहिलेलें नाहीं. टर्नरच्या कुंचल्याच्या प्रत्येक फटकाऱ्याचें व प्रत्येक रंगछटेचें कौतुक आपल्या लालित्यपूर्ण भाषेचीं फुलें उधळून रस्कीननें केले आहे. रस्कीनच्या या लेखामुळें टर्नर संस्मरणीय झाला. उलट टर्नरवरच्या लेखामुळें रस्कीनचें नांव कलासमिक्षक म्हणून कायमचें अमर ठरलें.

पण असा हा प्रतिभाशाली कलावंत टर्नर इतरांच्या कलाकृतीं-कडे फारच मत्सरग्रस्त दृष्टीनें पाही. स्वतःच्या चित्राजवळ कोणाचें चित्र लागणार आहे, याची तो नेहमीं चौकशी करीत असे. ॲकॅडमींत त्याचें चित्र लागलें कीं आपल्या चित्राभोवती इतर कोणाकोणाचीं चित्रें







लावण्यांत आलीं आहेत आणि त्या चित्रांतील रंगसंगतीमुळें आपलें चित्र तर म्लान दिसत नाहीं ना–इकडे त्याचें फार लक्ष असे. एवढेंच नव्हे तर आपलें चित्र इतरांच्या चित्रांपुढें फिकें दिसत आहे अशी त्याला शंका आली तर तो स्वतःचें एकदां तयार झालेलें चित्र संपूर्णपणें बदलून टाकी. 'The fighting temeraire toward to her last berth,' हें या लेखासोबत छापलेलें चित्र त्यानें असेंच बदलून टाकलें. टर्नरचें हें चित्र म्हणजे निसर्गचित्रणाचा एक उत्कृष्ट नमुना आहे. टर्नरच्या निसर्गचित्रणाचें वैशिष्ट्य असें कीं केवळ एक निसर्गचित्र रगवणें एवढाच त्याचा हेतू त्या चित्रामागें नसे. मुग्ध भावनांना अलगद फुलविण्याची किमया त्या चित्रांत सामावलेली असे. केवळ सुंदर फुला-पेक्षां सौगंध देणारें फूल जसें जास्त आल्हाददायक वाटतें तद्वत मानवी भावनांना आव्हान देणारी हीं टर्नरचीं निसर्गचित्रें रसिकांच्या मनाला मोहून टाकतात.

समुद्रावरून जाणारी एक बोट एवढाच या चित्राचा विषय नाहीं. या चित्रामागें एक कथा आहे. टेमेराइरे ही बोट अखेरच्या प्रवासाला निघाली आहे. युद्धकाळांत गाजलेली ही बोट आतां वृद्ध झालेल्या योद्ध्याप्रमाणें थकली आहे आणि या अखेरच्या प्रवासांतच तिला अपघाती मृत्यू येणार आहे! सूर्य अस्ताला जात आहे आणि अस्तंगत होणाऱ्या त्या म्लानवदन सूर्यनारायणाशीं या बोटीचें विलक्षण साम्य आहे. हें केवळ निसर्गदृश्य नव्हें. एक शोकांतिका इथें सचित्र करण्यांत आली आहे.

टर्नरनें हा साराच देखावा म्लानरंगांत प्रथम रंगवला होता. काळोखाची एक विशण्ण छाया साऱ्या देखाव्यावर पसरली होती आणि चित्र विषयांतल्या कारुण्याला तें पोषकही होतें. ही कलाकृती टर्नरच्या अनेक मित्रांना आवडली.

पण पुढें १८३९ मध्यें जेव्हां ही कलाकृती ॲकॅडमींत लावली गेली तेव्हां या चित्राचा प्रभाव मुळींच पडेना. या चित्राजवळच गेडेसने काढलेलें बहारदार रंगांतलें चित्र लावण्यांत आलें होतें आणि त्या चित्रांतल्या रंगछटा इतक्या तजेलदार होत्या कीं त्यामुळें टर्नरचें चित्र नजरेंत भरेनासें झालें. टर्नरच्या लक्षांत ही गोष्ट येतांच तो अस्वस्थ झाला.

चित्रांना तेलपाणी करण्याच्या निमित्तानें ज्या दिवशीं ॲकॅडमी बंद असतें त्या दिवशीं वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या खास परवानगीनें टर्नरनें ॲकॅडमींत आपल्या रंगसाहित्यासह प्रवेश मिळवला आणि केवळ एका दिवसाच्या अवधींत त्यानें आपल्या चित्रांतलें सारेच रंग बदलून टाकले. तांबड्या आणि पिवळ्या रंगाचा अपूर्व साज त्यानें आपल्या चित्रावर चढवला. संजीवनी मंत्रानें पुनर्जीवित व्हावें त्याप्रमाणें नव्य स्वरूपांत टर्नरचें हें चित्र तळपूं लागलें. गेडेसनें काढलेलें चित्र त्यामुळें निष्प्रभ झालें. टर्नरच्या या हिकमतीमुळें टर्नरजवळ चित्र लावायला कलावंत फारसे राजी नसत.

टर्नरच्या अहंकारीमनाला यत्किंचित धक्का लागला तरी तो स्वतःच्या घरांतून मध्येंच नाहींसा होई आणि मग कैक दिवस तो घरीं परत येत नसे. या काळांत तो कुठें जाई तें त्याच्या मृत्यूपर्यंत कोणालाच माहीत नव्हतें. या अज्ञातवासाच्या काळांत तो ११९ चेलसी येथें रहाणाऱ्या एका स्त्रीकडे मुक्काम ठोकी. तिच्याकडे असतांना तो कधीं घराबाहेर पडत नसे. तिच्या घराच्या छपरावर असलेल्या गॅलरींत तो सकाळपासून संध्याकाळपर्यंत सृष्टिशोभा पहात बसून रहात असे. मधूनअधून येणारा हा पाहुणा म्हणजे सुप्रसिद्ध चित्रकार टर्नर होय या गोष्टीचा पत्ता त्या स्त्रीलाही लागलेला नव्हता. आपण नाविक दलांत काम करीत असून आपलें नांव 'ॲडमिरल बूथ' आहे असें टर्नरनें तिला सांगितलें होतें. अखेरपर्यंत त्याच्या या गौप्याचा स्फोट झाला नाहीं. १९ डिसेंबर १८५१ ला दुर्दैवानें टर्नर मेला तो या स्त्रीच्या घरींच! अखेरीस जेव्हां त्याच्या अंत्यविधीसाठीं माणसें गोळा झालीं तेव्हां 'ॲडमिरल बूथ' हा अलौकिक चित्रकार 'टर्नर' असल्याचें लोकांच्या नजरेस आलें.

टर्नरची संपत्ती एकलक्ष चाळीस हजार पौंड भरली. त्याच्या हयातींत एक असामान्य चित्रकार म्हणून त्याची ख्याती सर्व युरोपभर पसरली होती. असें असूनहि हा गृहस्थ असा अज्ञातवासांत कांहीं काळ कां घालवी? त्याचें कारण एकच होतें कीं त्याचें मन मत्सरानें पिडलेलें होतें. या मत्सरी स्वभावानें त्याचा मनःस्ताप इतका वाढे कीं तो घालवण्यासाठीं तो अज्ञातवासाचा आश्रय करी.

—प्रा. भय्यासाहेब ओंकार

---

* पान १९ वरून

गेला होता. पोर्तुगीज सैनिकांच्या जीपगाड्या सारख्या पळत होत्या; आपापलीं ठाणीं सोडून सर्व गोरे सैनिक पणजीच्या दिशेनें पळत होते. क्वचित जातां जातां आजूबाजूला ते गोळ्या झाडत होते. पण ते हताश-पणेंच! त्यांचीं पिस्तुलें रस्त्यांत गळून पडलीं होतीं; बंदुकीच्या गोळ्यांचे पट्टेच्या पट्टे रस्त्यांत सांडले होते, बंदुका, स्टेनगन्स सुद्धां त्यांना खाली टाकल्याचं भान राहिलं नव्हतं. आणि हें गोव्याचं एक टोक होतं. लष्करी कारवाई प्रत्यक्ष दुसऱ्याच टोकाला सुरू झाली होती.

दि. १९ डिसेंबर ६१. त्या दिवशीं सकाळीं आम्हीं बेतीमला पोंचलों. भारतीय लष्करानें रातोरात पणजीपर्यंत धडक मारली होती. पणजी अजून रीतसर ताब्यांत आली नव्हती. मांडवीच्या अलिकडच्या तिरावर भारतीय सैनिकांचा तळ पडला होता. एका लष्करी टँकवर बसून एका परदेशी वार्ताहराबरोबर, मी मांडवीच्या पलीकडील तिरावर पणजीला घडामोडी होत होत्या; त्यांचं निरीक्षण एका लष्करी अधिकाऱ्याच्या प्रभावी दुर्बिणींतून करीत होतो. पणजीच्या गव्हर्नरच्या बंगल्यासमोर कांहीं पोर्तुगीज सैनिक गोळीबार करीत आजूबाजूला धावाधाव करीत होते. एका बाजूला मांडवी हॉटेलच्या समोरच्या मांडवी नदीच्या धक्क्यावर त्यांनीं पांढरे निशाण फडकत ठेवलें होतें. आमचे भारतीय सैनिक पलिकडे जाऊन पोंचले होते. पोर्तुगीज सैनिक अवघे मूठभर असतील नसतील. भारतीय जवानांनीं मनांत आणलं असतं तर त्यांना क्षणार्धांत यमसदनाला पाठविलं असतं. माझ्या शेजारचा परदेशी वार्ताहर इंग्रजींत म्हणाला सुद्धां......

'Why should they not be shot instantly?'

मेजरच्या हुद्याच्या आमच्या शेजारच्या हिंदी अधिकाऱ्यानें त्याच्याकडे पाहून केवळ मंद स्मित केलं.

पण त्याच पोर्तुगीज सैनिकांनी आग्वादच्या तुरुंगांत त्याच दिवशीं पहाटें आमच्या तीन भारतीय जवान अधिकाऱ्यांचा दगाबाजीनें बळी घेतला होता. शरणागतीसाठीं समोरून हात वर करून त्यांना मागून अकस्मात् गोळ्या घालण्यांत आल्या. आणि केव्हां? सारं गोवं जिंकून घेतल्यावर......तीच आसुरी व बेशरम दगाबाजी चिन्यांची ब्रिगेडियर हरिसिंगांचा वध करतांना केली...

पोर्तुगिजांच्या या पाशवी कृतीनेंच जबाब देणें भारतीय जवानांना कधींच अवघड झालें नसतं. परंतु दगाबाजी करून सुद्धां शरण आलेल्या





आग्वादच्या किल्ल्यांतील पोर्तुगिजांबरोबर इतर गोऱ्या सैनिकांना भारतीय सैन्याकडून अभयदान व जीवदान देण्यांत आलं.

भारतीय जवानांचं गोव्यांत मला दर्शन झालं तें अशा स्वरूपाचं होतं. शूर आणि तरीही संयमी. वसईच्या किल्ल्यांतील फिरंगी स्त्रीने चिमाजी अप्पाला उद्देशून काढलेले उद्गार मला पुनः पुनः आठवले. पोर्तुगिजांना ते पूर्वीच आठवले असते तर !...चिन्यांना हें भारतीय जवानांचं परंपरागत उदात्त व्यक्तिमत्व कधींतरी आकलन होणार आहे काय !...तथाकथित मुक्तिसेनेचें युक्तिसेनेंत रूपांतर करून माणुसकीच्या मर्यादा उद्दामपणें उल्लंघन करणाऱ्या चिनी नव–साम्राज्यवाद्यांच्या दगाबाजीशीं भारतीय जवान किती रौद्र स्वरूपांत यशस्वी लढा देऊं शकतो व निर्दयपणें त्याला ठेंचून काढूं शकतो–हें पोर्तुगिजाप्रमाणेंच त्यांच्याही लक्षांत आल्याशिवाय रहाणार नाहीं.

भारतीय जवान हा असा आहे ! त्याची परंपरा ही अशी खोल ...कांत अन् मर्दुमकींत अमरपणें रुजलेली आहे; असेंच भारतीय जवानांचं तेजस्वी दर्शन गोव्यांत मला झालं.

एक दृश्य माझ्या डोळ्यासमोर उभं रहातं. पकडून आणलेल्या हजारों पोर्तुगीज सैनिकांना वेर्तामिच्या किनाऱ्यावर एका टिकाणीं एकत्र करून ठेवण्यांत येत होतं. सकाळचे दहा वाजून गेले होते. शरणागती सर झाल्याची तिकडून घोषणा झाली होती. अलिकडून पलिकडे नौकांतून माणसांची ये जा सुरू झाली होती. तिरंगी झेंडे सर्वत्र हवेंत सळसळत फडफडत होते. पोर्तुगिजांचें चारशें वर्षांचें भारत–भूवरील वास्तव्य संपलें होतें. लोकांचे थवेच्या थवे पोर्तुगिजांना पहाण्यासाठीं गर्दी करीत होते. बाजूलाच माडांचीं बनें दाटीवाटीनें झावळ्यांची सांवली खाली पसरीत डौलानें डुलत होतीं. घोषणा होत होत्या. डोक्यावर एक विमान नागरिकांना सूचना देत व पत्रकें टाकीत गरगरा फिरत होतं. हवालदील झालेले पोर्तुगीज सैनिक उघड्या अंगानें गाडयांतून खाली उतरत होते. त्यांना दोरखंडांनी बांधण्यांत आलं होतं. एक चड्डीच तेवढी लज्जारक्षणार्थ त्यांच्या लालभुंद रसरशीत देहावर घट्ट लगटून होती. अठरा वर्षांच्या पोरापासून तो बापयांपर्यंत सर्वजण पकडले गेले होते. दृश्य मोठं करुण होतं. मी कांहीजणांना कांहीं वर्षे कित्येक टाण्यावर सतत पहात होतो, ते पोर्तुगीज अधिकारी माझ्या दृष्टीला पडले. मला त्यांची मग्रुरी आठवली. त्यांनी एका गरोदर स्त्रीवर टाकलेला हात आठवला. लष्करकोर्टचं हत्याकांड

...पान २८ वर










# आ द त

—रा. रं. बोराडे

*ही बाई कुठणं आणि कां आली हें मला कळेना. येड्याबानीं म्यां तिच्या तोंडाकडं टकामकां बगाया लागलो. तंवा ती माज्याकडं बघून हंसाया लागली......*

चंद्र नुकताच मोहरला होता आणि फिक्कट चांदणं सगळीकडं पसरलं होतं.

जोंधळ्याचं पिक शांत उभं होतं. वारा कुठंतरी अडकून पडला होता आणि त्यामुळं ताटाचं पान देखील हालत नव्हतं. सगळीकडं कसं नुसतं शांत होतं. दावण ठोकून वाटकावर बांधलेल्या बैलांचा श्वास देखील ऐकायला येत होता.

यंदा थंडीचा कडाका जास्तच वाढला होता. आणखी रात्र उतारांत पडली नव्हती. तरी अंगावर शहारून कांटा यावा अशी थंडी वाजत होती. दांतावर दांत ठरत नव्हता आणि हाताचीं बोटं गारठण पडली होती.

बाजीरावानं आगटी पेटविली होती. रसवंतीत आर केला होता व गारठण पडलेल्या अंगाला तो शेक देत होता. अधुनमधून तो पिकाकडं नजर फेकीत होता. चोरांपासून, गुरांपासून पिकाला जपत होता. वेळेचा निश्चित अंदाज करता येत नव्हता. तरी पण पाररात झाली असावी. कारण गांवांतले बहुतेक दिवे विझलेले दिसत होते. वाळच्या बगलीत कोल्हे एकमेकांना साद देत होते व त्यांचा आवाज त्या शांत वातावरणांत अगदींचं भेसूर वाटत होता.

बाजीरावानं खिशांत हात घातला. बंडलांतली विडी काढून घेतली; विस्तवावर धरून पेटविली व तो निवांत ओढूं लागला. अधुनमधून पिकावर चौफेर नजर फेकूं लागला.

थोडा वेळ असाच गेला आणि एवढ्यांत पिकात कसली तरी सळसळ होऊं लागली. तो तटकन् उठला व आवाजाच्या रोखानं पाहूं लागला. पहिल्यांदा त्याला कांहींच दिसलं नाहीं. पण नंतर त्याला त्या ठिकाणीं मनुष्याची आकृती दिसूं लागली. बाजीराव झटकन् खालीं वाकला. अगदीं जवळ ठेवलेल्या गोफ्यांतून दोन गोटे उचलून घेतले व तो तयारीनं उभा राहिला. एखाद्या वेळीं कणसं खुडण्याचा किंवा कांहीं चोरण्याचा प्रयत्न केला तर त्याच्यावर गोटा सोडण्याचा त्यानं निश्चय केला.

तो इसम आणखी थोडा पुढें आला आणि मग बाजीरावानं त्याला बरोबर ओळखलें. माळ्याचा एकनाथ होता तो! साऱ्या अंगाभोवतीं त्यानं घोंगडं गुंडाळून घेतलं होतं व सावकाश पावलं उचलीत तो त्याच्याच रोखानं येत होता.

तो जवळ येईपर्यंत बाजीराव गप्प उभा राहिला व जवळ आल्यानंतर त्यानं विचारलं,

'गांवाकडनं आलास का?'

आगटीजवळ बसत तो म्हणाला,

'न्हाई. शेतांतनंच आलोय.'

'अस्या बेटाइमाला का?'

'तापत बसलों व्हतों; पर एकट्याला करमंना आन् मनबी लागंना. मग इचार केला, हितं बसावं ते तुज्याकडं जावं आन् चार गोष्टी बोलाव्या. तेवढंच मनाला बरं वाटलं.'

'बरं झालं. मलाबी करमना गेलंत.'

त्यानं एकवार एकनाथाला न्याहाळलं. अंग दुमडून बसावं तसा एकनाथ बसला होता. साऱ्या अंगाभोवतीं त्यानं घोंगडं लपेटून घेतलं होतं. तोंडाशिवाय शरीराचा थोडा देखील भाग उघडा दिसत नव्हता.

'येवस्थित बस की जरा'

'नग बाबा!'

'का?'

'थंडी कसली पडलीय. अंग करपून जाईल अस्या थंडीनं.'

'मंग म्या कसा बसलोयं?'

'तुजं येगळं हाय बाबा. कळबंड मानूस हायेस तूं.'







अनुक्रमणिका

' आनि तूं अेवढा नाजूक कवापास्न झालास ? असल्या हिवाळ्यांत पर तूं रामाच्या पान्यांत हिरीला आंघोळ करतोस. ठाव न्हाय का मला. '

या बोलण्यानं अेकनाथ थोडा वरमला. खालीं मान घालून म्हणाला,

' अेरवी तसा म्या खंबीर हाय, पर कालपास्न जरा बरा न्हाअी.

' काय व्हतया ?

' जरा अंग मोडून येतंया '

' मंग बरोबर हाय तुजं.

असं म्हणत बाजीरावानं खिशांत हात घातला वा अेक विडी काढून त्याच्या समोर धरीत तो म्हणाला–

" घे विडी वढ "

" नग मला "

" का ? "

" एवढी काय मला तलपु न्हाअी. ",

" मलाची बनवाया लागलास का ? रोजचं एक बंडल पुरत न्हाई तुला आन् म्हनतोस मला तलपु न्हाई. "

" कालपास्न वासनाच जाईना विडीवर "

" का ? "

" बरं न्हाई व्हवं का कालपास्नं "

" मग खरं हाय तुजं "

असं म्हणत बाजीरावानं विडी काढली. समोरच्या आरावर धरून शिलगावली व तो आरामांत झुरके मारूं लागला. मध्येंच त्यानं ऐकनाथाकडं पाहिलं. त्याच्याकडं पाहत तो गपचीप बसून होता. मग त्यानं व्यवस्थित मांडी घातली व ऐकनाथाला म्हणाला--

' तुला एक गंमत सांगूं का एकनाथ. '

' कसली गम्मत ? '

' काल हितं ह्या आगटीवर घडलेली '

' सांग की. तुज्यासंगं बोलत बसावं म्हणून तर आलोया. '

' पर तुजा न्हाई इस्वास बसायचा '

' आसली कसली गोष्ट हाय ? '

' तसलीच हाय '

' सांग तर खरं '

' काल हीच येळ व्हती बग. म्या असाच तापत बसलों व्हतों. एवढ्यांत भिरकन वारं आलं. एवढं वारं आलं की म्यों गपकंन डोळे झाकून घेतले. वारं गेलं आन् म्या डोळे उघडून बगतों तर तुज्यावानीच असा अंगावर पांघरुण घेतलेला मानूस समोर उभा. म्या इचारलं–कोन हायास बाबा ? तो हसला आन् म्हणाला ' म्या वाटसरूं हाय.

' का आलास ? '

' थंडी लई वाजाया लागलीय. तापाया आलोया ? '

असं म्हणून तो आकटीजवळ तापाया बसला. म्या इचारलं–

' कुन्या गांवचा हायीस ? '

तो म्हनाला—

' ढाकनीचा हाय '

' कुठं निगालास ? '

' चिंचोलीला '

असं म्हणत तो निवांत तापत बसला.

म्या त्याला इचारलं

' विडी वडतोस कां ? '

तो म्हणाला,

' नग '

' का ? '

' विडीचं तलफ न्हाअी मला '

म्याबी जास्त त्याला आग्रेव केला न्हाअी. तो आरामांत तापत बसला. पर म्या वळकायचं ते तंवाच वळखिलं व्हतं. '

' काय वळकिलं व्हंतस ? '

आरं तो वाटसरू न्हवता '

' मंग कोन व्हतां तर. ? '

' भूत व्हतं '

अेकनाथानं टाचरून विचारलं–

' भूत व्हतं '

' व्हय '

' कस्यावरनं ? '

' भुताचा तंवाच वास येत असतो '

' वास येत असतो ! '

' व्हय '

' कसला वास येतो ? '

' आसला म्हनून सांगाया येत न्हाअी; पर वास येत असतो अेवढं खरं '

' कुनालाबी येतो का ? '

' छ्या, माज्या सारक्या अेकाद्यालाच येत असतो. '

एकनाथानं घाबरून विचारलं—

" आतां येतो कां ? "

" छ्या, तवढ्या पुरतांच येत असतो. "

ऐकनाथ गालांत हसत म्हणाला–

" बरं, मंग ?

" मंग, म्या त्याला गप्पांत गुंगविलं तंवर हात लांबऊन इळो घेतला, हळूंच हस्त्यात घातला. चांगला लाल हुइस्तवर तापवेला आन् त्याचं हिकडं ध्यान न्हाई असं बगून त्याच्या अंगावर टाकला.

" आन् मंग "

" इळा अंगावर पडल्यावरूबर तो चिरचिर चिरकला आन् मनान पळून गेला. "

" म्हंजी तूं भेन न्हाईस भुताला ! "

" छ्या. त्याच्या बापाला सुद्धां भेत न्हाई. ऐकदां तर त्यांच्या पालखीसंग गेलतो. "

' कंवा ? '

' गेल्या आमोस्याला. मी असा शेतांत बसलों व्हतों. रातरीचा वक्त व्हता. ह्या खालच्या झाडवनांत मला दिवट्या दिसाया लागल्या. म्या इचार केला. ह्यो भुताचाच ताफा दिसतोया. म्या लगेच पायांत जोडा घातला आन् निघालों त्यांच्याकडं '

' कस्याला ? '

' उग गंमत बगायला '

' बरं मग '

' जवळ जाऊन बगितलं तर कितीबी भुतं. दिवट्या घिऊन नाचाया काय लागलेत. हसाया काय लागलेत. खिदळाया काय लागलेत. कितीबी मजा. म्या भ्यालों न्हाई. सरळ त्यांच्याजवळ गेलों. मला बगितल्यावरूबर सगळ्यांनी गरकांडा घातला. मला मध्ये घेतलं आन् मला भेडवाया लागले. अंगावर धावून काय याया लागले. वाकडं काय दावाया लागले. पर म्या व्हतो खंबीर. म्या उगंच त्यांची गंमत बगितली बगायचं तंवर बगितलं आन लईच गंमत कराया लागले तंवा फुकला मंतर '



अहो, संरक्षण निधीला देण्यासाठी मला थोडे पैसे उसने देतां का ? तुमचा पगार झाला कीं परत देईन ?

'तुला मंतरबी येतो का ?'

'तर रं. पटाईत हाय की म्या त्यांत'

'मंग काय झालं ?'

'मंतर फुकल्यावरूबर भुतं घाबरले आन् लागले माज्या पाया पडायला. म्या मंग त्यानला माफी दिली आन् त्यांच्यावरूबर येताळाला भेटाया गेलों. येताळाजवळ गेल्यावर मंग तितं सगळ्यांचं जेवान झालं.'

'एकनाथानं हंसत विचारलं–

'काय व्हतं जेवायला ?'

'लई आरकार परकार व्हंते, एकाद्या वस्तूचं त्यानी नांव घ्यायचं आन् लगेच ती–वस्तू त्यांच्या संमोर यायची. डोंगरा एवढा तर ढिग पडला व्हता. अन्नाचा.'

'एवढं बी खाल्लं कां ?'

'पार खल्लास केलं. काइ म्हनता काइ ठिवलं न्हाअी.'

'मग ?'

'जेवान झाल्यावरूबर हडळीचं मस्त नाच काम झालं.–गाणं बजावनं झालं. फाटपतवर धिंगाना चालला. फाट झाली तंवा पालखी वापस आली.

बाजीरावानं परत दुसरी बिडी पेटविली आसपास बसून एक झुरका मारला व नंतर म्हणाला–

'ह्या हाडळीबी महाल्याद असतात बरं का एकनाथ. मानसाचं सोंग घेल्यात आन् त्यांचा तपास करीत रानातनं हिंडल्यात.'

'तपास का करत्यात ?'

'हात मरदा रं. निव्वळच येडपट हायीस बग. बाया गड्याचा तपास का करत्यात ?'

'मला काय ठावं ?'

'तर ! तर ! तुला कुठलं ठावं ? निव्वळ मारुतीचा अवतार लागून गेलास न्हवं !'

एकनाथाच्या आतां सारं लक्षांत आलं मान हलवीत तो म्हणाला–

'हां ! आसं म्हनतोस व्हयं ! बरं पर तुला कुनी सांगितलं ?'.

'काय' ?

'मानसाचं सोंग घेऊन हाडळी गड्याचा तपास करत्यात म्हनून'

'आरं सोता माज्यावर परसंग आलता'

'अेकनाथानं आश्चर्यानं विचारलं–

'तुज्यावर ?'

'व्हय'

'कंवा ?'

'अेक म्हयना झाला बग'

'कसं कसं झालं'

'म्या हितंच रानात झोपलों व्हतों. तंवा आगटी पाडली नव्हती. एकटाच घोंगडं टाकून म्या झोपलों व्हतों. एकढ्यांत पाठीमागं कसला-तरी आवाज झाला म्हनून बगितलं तर अंधा-रात एक बाअी दिसाया लागलीया. म्या बारीक नजरंनं बाअीकडं बगितलं. बाई चांगली खुप-सुरत दिसत व्हती. ही बाई कुठणं आन् का आली हें मला कळंना. येड्यावनी म्या तिच्या तोंडाकडं टकामका बगाया लागलों. म्या सारखं तिच्याकडं बगाया लागलों. तंवा ती जरा पुढं सरली. आन् माज्याकडं बगून हसाया लागली. मंग मातर मला वाटलं कुठल्यातरी वस्तीवरची बाई असावी आन् मुद्याम आपल्याकडं आली असावी. मंग म्या खुणावून तिला जवळ बोल-वाया लागलों. पर ती मान हलवाया लागली."

'का बरं ?'

'तिच्या मनांत काई येगळंच दिसत व्हतं'

'बर मंग ?"

'मंग म्या उठलों आन् तिच्या जवळ गेलों. बर ती पाठ फिरवून चालायाच लागली. म्या थांबलो की ती थांबाया लागली आन् तिच्या

मागनं म्या याया लागलों की ती पुढं चलाया लागली.

" चांगलीच बांजिदी दिसत व्हती "

" तर रं ! पक्की व्हतीन् "

" बरं मग ! "

" म्या मागं आन् ती पुढं पुढंच चलाया लागली. खोपीपतवर तिनं मला न्हेल. खोपीच्या दाराजवळ गेल्यावर ती थांबली. माझ्याकडं बगून हंसली आन् खोपींत शिरली. म्याबी लगेच तिच्या मागनं खोपीत शिरलों. खोपीत अंधार गुडूप होता. कांहीं सुद्धां दिसत नव्हतं. म्या हात लांबविला. तिचा तपास केला तर माज्या हाताला तिचा पदर लागला. मडसूत पदर हातांत आल्याबरूबर माझं भानच सुटल. म्या खसकन् तिला वढल. कव्यांत आवळलं आन् असंच तोंडाजवळ तोंड न्यावं म्हनताच–

—म्या एकदम दचकलो '

' कां ? '

' तिच्या हाताला हात लागला आन् हात उलटं हायीत असं समजलं मला.'

' तंवर कळालं न्हाई का ? '

' न्हाई. '

' तुज्या सारक्याला कळाया फायजी व्हतं '

' आरं पर कळनार कसं ? '

' वास आला न्हाई का तिच्या अंगाचा. '

' हां, हां, ते म्हनतोस व्हय. त्याचं आसं हाय : भुताच्या अंगाचा वास येत असतो. हाडळीच्या अंगाचा नसतो वास येत. '

एकनाथ गालांत हसला परत म्हणाला–

' बरं मग, पुढं काय झालं ? '

' काय करावं हें मला घडीभर सुचंनाच गेलं. बाई तर आवळूं आवळूं धराया लागली आन् तोंडाजवळ तोंड आनाया लागली. मंग म्या खालीं वाकलों. हातात माती घेतली मंतर टाकून माती भारली आन् सपकन् तिंच्या अंगावर मारली '

' आन् मंग ? '

अंगाला माती लावल्याबरूबर ती चिरचिरी चिरकली आन् पार पसार झाली. '

' मजा आली म्हना की '

' कसली मजा आलीय. थोडक्यांत वांचलो. '

' कां ? '

' हडळीच्या अंगाला अंग लागल्याबरूबर काय व्हतं असतं ठाव हाय का ? '

' काय व्हत आसतं ? '

' भुत व्हत असतो मानूस '



एवढं बोलणं होईपर्यंत रात्र उतारांत पडली होती. बाजीरावाच्या डोळ्यावरहि आता झोप चढत होती व एकनाथहि बसून कंटाळल्या-सारखा दिसत होता.

' बरं, मंग, म्यां चालतो. '

' व्हय. जपून जा जरा '

' आतां कंवा भेट आपली ? ' एकनाथानं गालांत हंसत विचारलं—

' उंद्या पडल की '

' मंग ह्या येळला येतो '

' दिवसा येत न्हाईस का ? '

' दिवसा नग. रातच्यालाच यीन '

' बरं ये, ह्या टाईमाला '

' बरं '

' एवढं बोलल्यानंतर तो उठला. बाजीरावा-कडं पाहून तो गालांत हंसला आणि आलेल्या वाटेनं तो सावकाश पावलं उचलूं लागला. बाजीरावाची नजर एकदम त्याच्या पायाकडं गेली. त्यानं त्याच्या पायाकडं पाहिलं. अगदीं बारकाईनं पाहिलं आणि तो ताबडतोब बेशुद्धच पडला.

— एकनाथाचे पाय उलटे होते !











—श्रीराम कामत

मेजर धर्मवीर सांगत होता, वाटेंत कांहीं निघालं नाहीं तर दुपारलाच आपण मुक्काम गाठूं. आपल्या लोकांनीं मात्र तोंपर्यंत नेट धरला पाहिजे. खात्री नाहीं आपली तुकडी जायची, पण त्यापूर्वीच आपल्या फौजांनीं माघार घेतलेली असायची. '

ते दोघेच पुढं होते. मेजर धर्मवीर आणि हवालदार सावंत. तुकडींतील बाकीचीं माणसं जरा मागं पडलीं होतीं.

'माघार ? भारतीय फौजा ही एकच गोष्ट करीत नाहींत, मेजर.' हवालदार सावन्त आवेशानं म्हणाला. खाकेंतील रायफल त्यानं उगाच सावरल्यासारखी केली. पिसाचा शिरपेंच असलेली डोक्याची टोपी नीट केली आणि तसं डाव्या खांद्यावरच्या लाल फितीकडे त्याचं लक्ष गेलं. आणि मग अभिमानानं मागं गर्द हिरव्या गणवेशांत नेटानं पावलं टाकीत येणाऱ्या जवानांकडे तो बघूं लागला.

गेले कित्येक दिवस ते मजल मारीत होते. मुलुख अपरिचित, दाट जंगलाचा. सरळ असा रस्ता नव्हताच. सांपडलीच तर क्वचित कुठं पायवाट. तिलादेखील नक्की आगापिछा असेल याचा नेम नव्हता. मेजर धर्मवीर त्याच्यापाशीं असलेल्या नकाशावरून अंदाज घेई. आणि त्या अंदाजानं मार्ग बांधी. कधीं हे अंदाज चुकत, कधीं ते वाटच चुकत. आणि तरीही त्यांची आगेकूच चालूच होती—कडे आणि कपारी धुंडाळत, दरी आणि बळी तुडवीत, माजलेल्या गवतातून आणि दाटलेल्या झाडाझुडपांतून. माणसांची वस्ती त्यांना कुठं लागलीच नाहीं. पण जनावरांना मात्र तोटा नव्हता. पायाखाली काय आलं तें बघायला ते थांबत नसत. वेल म्हणून लोंबणाऱ्या अजगरलाही नकळत हातानं बाजूला करीत आणि त्या थंड, लिबलिबीत अंगाचा स्पर्श होतांच शहारून हात झटकत, चटू, बाजूला होत. कुठं हरिण, ससा, क्वचित रानडुक्कर—आणि पाखरंसुद्धां दिसली कीं कुणीतरी साधून नेम टिपायचा. पण नसत्या शिकारीमागं फुकट वेळ दवडण्यास त्यांना सवड नव्हती. तिकडे आघाडीवर तांतडीची कुमक हवी होती. तीच घेऊन ते निघाले होते. शिवाय निरुपद्रवी जनावराना गोळ्या घालायला त्यांच्याकडे काडतुसांचा तसा खूप सांठा नव्हता.

हवालदार सावंत दुसऱ्या महायुध्दांत आघाडी गाजवून आला होता. गोऱ्या आणि निग्रो सैन्याबरोबर खांद्याला खांदा लावून जपान्याविरुध्द लढलेला गडी तो. सांगायचा '—उभ्या दुनियेंत आपल्या देशाइका सुंदर देश नाहीं, काय ? आणि आपल्या फौजेसारखी झुंजार फौज नाहीं. आतां कोणी झाला तरी आपलंच उत्तम म्हणून गमजा मारणारच. पप त्यांत बिलकुल अर्थ नाहीं. निग्रो सोजीर रिकाम्या पोटावर बिलकुल कुचकामी. बाकी भरल्या पोटावर मात्र कसा वाघ. गोरे लोक मुलखाचे भित्रे. सापाकिरडांना जाम डरतात. आणि अगदीं आघाडीवर देखील बादशाही थाट हवा असतो त्यांना. जेवताना काटेचमचे, निजायला कमसेकम मच्छरदाणी, पायांत जाड टांचेचे बूट आणि प्रातर्विधीली ते तुमचे कागद—आणि हें नसलं कीं गोरा बिथरलाच. एकदां बिथरला कीं तो काय कामाचा नाहीं.

वाटेल त्या परिस्थितींत गनिमावर बेगुमान धडक द्यावी फक्त आपल्या जवानांनीच. बाकीच्यानी तें बघावं आणि मग पदकं देऊन फारतर गौरव करावा. आपल्या बिरांची हिंमतच मुळी अवधाण, तें पाणीच न्यारं. असा कडका, लेचापेचा दिसणारा जवान प्रत्यक्ष हातघाईच्या चकमकींत बिजलीसारखा फुफाट उसळतो आणि मग काय न् कशी मर्दुमकी गाजवून जातो एका परमेश्वरालाच माहीत ! कारण खुद्द त्या जवानाला पत्ताच नसतो. मागाहून कळतं आणि तेंही जगला वाचला तर—'

हवालदार सावंत नुसत्या आठवणीनीच विरघळा होता. मागून येणाऱ्या आपल्या जवानांकडे बघत तो तसाच उभा राहिला आणि त्याची छाती दोन इंच फुगली. गर्दन ताठ झाली. आवाज जड झाला. ठाम विश्वासानं तो मेजरला म्हणाला, '—साहेब कळीकाळासंगं झुंज देऊन त्यालाही माघार घ्यायला लावतील हे आपले जवान—'

'—मला माहीत आहे रे ! पण—' धर्मवीर अर्ध्यावरच थांबला. त्याला बोलायचं होतं. पण त्यानं स्वतःला कष्टानं आवरलं आणि तो हंसत सुटला. त्याची ती पद्धतच होती. पण त्या हंसण्यांत जीव नव्हता.

आणि निमूट ते बाजूची दरड चढूं लागले. रस्ता सोडाच, ती साधी पायवाट देखील नव्हती. गवतांतून, वेलीझुडपं हातानं बाजूला करीत प्रथम ते दोघे आणि मागून जवानांची तुकडी निघाली आणि कुठल्याकुठं गडप झाली. नकाशांतील माहितीच्या आधारानं मेजर धर्मवीरानं आखलेली ती जवळची वाट होती. आतां ते चढत असलेला तेव्हढा तो डोंगर उतरला कीं थेट मुक्कामालाच पोंचणार असल्याचा तर्क होता. कोणाच्या लक्षांत येऊं नये म्हणून जंगलांतून जाणारी ही वाट त्यानं निवडली होती.

त्यांतल्या त्यांत उघड्या जागेंत आल्याबरोबर धर्मवीर हंसत म्हणाला, 'साप डसेलबिसेल या भीतीनं तीं पिवळीं भुतं या बाजूला फिरकणार नाहींत.'

आणि तसा मग एकच हंशा पिकला.

पिवळीं भुतं—

मेजरनं गनिमांचं केलेलं हें वर्णन बिलकुल बरोबर होतं. भुरक्या जाड केसाचीं, फिक्कट पिवळ्या वर्णाचीं, थंड खुनशी डोळ्यांची आणि आखूड चोर पावलांची हीं पिवळीं भुतं—

माणूस म्हणायला तीं थोडीच माणसं होतीं ? झुरळं, बेडूक, पाल हे अन् असले प्राणी खाऊन गुजराण करणारी ती मुर्दाड जात ! माणसं कशीं असतात अन् कशी जगतात बिचाऱ्यांना काय माहीत ? कसाबसा जीव जगवायचा—वाऱ्याला पाठ करून आणि पोटाला गांठ मारून. बस्स ! या परतं त्यांना कांहीं ठाऊकच नव्हतं. कोणी शिकवलंच नव्हतं.



अनुक्रमणिका



आणि न शिकवून कळायला त्यांना त्यांची अक्कल राहिली नव्हती.

खरंच !

एकेकाळीं माणसं असलेलीं पण आज माणुसकीलाच पारखीं झालेलीं हीं पिवळीं भुतं नंगानाच घालून राहिलीं होतीं. हातांत जळते पलिते घेऊन जग पेटवायला निघालीं होतीं. ना विचार, ना विवेक—तीं बेभान झालीं होतीं. आवर नाहीं, सुमार नाहीं—तीं बेदरकार झालीं होती. वेताळाची ती पिसाट भुतावळ रक्तामांसाची धुळवड साजरी करण्याकरितां उत्तर सरहद्दीवर भारतीय मुलुखांत घुसली होती.

आणि सत्तेच्या मदानं हिंस्र अन् उन्मत्त झालेलीं त्यांचीं टाळकीं ठेंचायला भारतीय जवान आज सज्ज झाला होता. मुडदा पाडण्यासाठीं उगारलेला प्रत्येक हात कलम करायला आणि माणुसकीच्या छातीवर पडणारा प्रत्येक पाय मुळांतून उखडायला समर्थशाली भारत खडा ठाकला होता. सत्य, शिव अन् सुंदर अशा भारतीय भूमीवर पाप्याच्या पितरांनीं चालवलेली ही निकमहराम कारवाई नेस्तनाबूद करणं जरूर होत. जरूरच नाहीं तर भारताचं तें आजचं कर्तव्य होतं. मानानं गगनांत फडकणाऱ्या आपल्या तिरंगी ध्वजाचा तो धर्म होता. अशोक चक्राची ती प्राणप्रतिष्ठा होती. प्रत्येक भारतियाची ती प्रतिज्ञा होती. तीं पिवळीं भुतं !

*...माणूस म्हणायला तीं थोडींच माणसं आहेत. झुरळं, बेडूक, पाल आणि असलेच प्राणी खाऊन गुजराण करणारी ती मुर्दाड जात—त्यांना माणुसकीची काय जाणीव ..... !*

'काळजी करूं नका बेट्यानों,' हवालदार सावंत निग्रहानं सांगूं लागला, 'जमिनीला काय रे तोटा या देशांत ? भरपूर आहे. पण इथं वर नाहीं. वर माणसं रहातात. भुतांची जागा खालीं. होयं—खड्डयांत. आधीं गोळ्या, मग माती. काय रे जमेल कां नाहीं ? तिन्यांना गोळ्या घालायचं काम तुम्ही करा. वर माती मी लोटतों—कसं ! '

'जमेल— सगळं जमेल ! बघाच आतां !' जवानांपैकीं एकानं हंसत जाब केला.

'घोडामैदान जवळ आलं बेटा.' मेजर धर्मवीरानं गंभीर स्वरांत म्हटलं. काय असेल तें असो. त्याला या अशा बोलण्यांत विशेष उत्साह नव्हता. नाहींतरी अधिकारीच पडला. त्याच्यावर मोठी जबाबदारी होती. आणि त्यांतल्या त्यांत खऱ्या परिस्थितीची फक्त त्यालाच कल्पना होती. प्रत्यक्ष आघाडीवर काय चाललं आहे तें त्याला एकट्यालाच माहीत होतं. आणि त्याच्या मतें तें सांगण्यासारखं नव्हतं.

'मैदानावर धांवणारीं शर्यतीचीं घोडीं नाहीं आपण, साहेब' दुसऱ्यानं मध्येंच म्हटलं.

'कोण रे तो ? सखाराम मोरेच ना ? वाटलंच.' सावंत कौतुकानं ओरडला आणि मिशांना पीळ भरत बघूं लागला. 'पोरा, वाटभर खूप एकली रे तुझी वटवट.'

'आतां आघाडीवर प्रत्यक्षच बघा.' सखारामानं सांगितलं.

'आं ! बघूं—तेंही बघूं. म्हणजे बघायला जगलों तर—'

'छा: ! तुम्हाला काय होतंय, हवालदार.' कुणीसं म्हटलं.

अरे आघाडीवर कोणाचं काय होईल नेम नाहीं बाबा.' भरल्या आवाजांत सावंत बोलला, पोरा, आघाडीवर जो तो ज्याचा त्याचा आणि आपण सगळेच राष्ट्राचे, ध्यानांत ठेवा हें. '—

हवालदाराला आणखींही बोलायचं होतं. या आघाडींत त्याचा अनुभव जसा दांडगा, तशी बोलण्याची हौसमुद्धां जबर. एकदा तोंड सुरूं झालं कीं थांबतां थांबत नसे. ऐकणाऱ्याला मुकाट सगळं ऐकून

घ्यावं लागे. मधे तोंड घातलं कीं सावंत उसळलाच. आणि मग त्याच्यासारखा वाईट तोच.

पण तितक्यांत दूर कुठंतरी एकदम मोठा आवाज झाला. एकच नाहीं, दणादणा आवाज सुरू झाले. पायाखालची जमीन हादरूं लागली. भोवतीचं जंगल त्या आवाजांनीं भरून आणि भारावून गेलं. आणि तसं सावन्ताच्या बोलण्याकडे कोणाचं लक्षच राहिलं नाहीं. खुद्द त्याचं सुद्धां.

'एनिमी–पिवळीं भुतं.' असं ओरडत त्यानं ताडकन् उडी ठोकली. आधीं झुडपाचा आडोसा गांठला. रायफल रोखून बचावाच्या पवित्र्यांत तो जमिनीवर पडून राहिला. बाकीच्यांनी पण त्याचंच अनुकरण केलं.

असा बराच वेळ गेला. झाडाझुडुपांआड बचावाची फळी उभारून ते पडून होते. जमिनीला कान लावून जवळपास कुठं पावलांचा आवाज होतो का म्हणून चाहूल घेत होते. बिथरल्या वाघाच्या भेरक्या नजरेनं आजूबाजूच्या झाडींत पिवळ्या तोंडाचे चिनी सैनिक कोणी दिसतात का म्हणून फाडफाडून बघत होते.

पण कुठं कोण? चिटपाखरूसुद्धां नव्हतं. बिलकूल सामसूम होती. फक्त दूर, तिकडे, डोंगराच्या पलिकडे तोफखाना दणक्यांत धडधडत होता. कुलपी गोळे फुटत होते. मशीनगन्स फटफटत होत्या. रायफली उडत होत्या–

म्हणजे तिकडे युद्धाला तोंड लागलं होतं.

पुरती खात्री करून घेतली आणि तसा मेजर धर्मवीरानं तुकडीला जवळ येण्याचा हुकूम दिला. खालच्या स्वरांत हवालदाराशीं त्यानं थोडी बातचीत केली आणि मग आगेकूच करण्याचा आपल्या लोकांना आदेश दिला.

आडोसा धरूनच ते पुढं सरकत होते–संगिनी रोखून, बुटांच्या पावलांचा आवाज होऊं न देतां चालणं कोणाला सुचतच नव्हतं. नाहींतरी काय गरज होती. आपण आघाडीवर आलों ही जाणीव प्रत्येकांत पोटतिडीकेनं उठली होती. होय–ती एकच जाणीव. आणि दुसऱ्या भावना अजिबात नष्ट झाल्या होत्या. तहानभूक हरपली होती; शरीराचा शीण जाणवत नव्हता, आपल्या जिवाचं काय होईल ही काळजी सतावत नव्हती. दुसरा कशाकशाचासुद्धां विचार उरला नव्हता. एकच जाणीव–आपण आघाडीवर आलों, आपण आघाडीवर आलों! त्या क्षणीं तरी शरीर आणि मन एकजीव होऊन एकसाथ वर्तमानकाळांत वावरत होती. भूतकाळांतील आठवणी आणि भविष्यांतील स्वप्नं वर्तमानकाळाच्या त्या चालू क्षणांत मिसळून गेलीं होतीं.

पुढंपुढं डोंगर उभा चढत गेला होता. चढण दमछाट करणारी होती. पाठीवर अवजड सामान घेऊन चढाव चढणं अवघड होत होतं. भोंवतालची झाडी सुद्धां हळूहळूं विरळ होत होती. फक्त भुईसपाट वनस्पती आणि जाड, कांटेरी गवत माजलं होतं. रंगबेरंगी भडक रानफुलांना मात्र सर्रास बहर होता.

माथ्यावर काळाकभिन्न काळा कडा आ वासून मार्गांत आडवा उभा होता. दुभंगलेल्या कपारींतून थंडगार पाणी झुळझुळ झिरपत होतं. तिथं शेवाळ दाटलं होतं. निसरडं झाली होती.

तो कडा पाहिला आणि मेजर धर्मवीरसुद्धां गडबडला, गोंधळून गेला. डोक्यावर हात घेऊन तो बघतच राहिला. या टोकापासून त्या टोकापर्यंत पांचपन्नास हात ताठ तटबंदीसारखा उभा असलेला तो कडा–कुठं तुटला नव्हता की फुटला नव्हता. चीर नाहीं, कपार नाहीं. चढायला सोपी जाईल अशी कुठं जागाच नव्हती. आणि तरीहि कडा चढून वर माथ्यावर जाणं जरूर होतं–पण कसा आणि कोण चढणार? माणसाचं तें कामच नव्हतं. आणि सैनिक असले तरी ती सगळीं माणसंच होतीं.

'सावंत–' हताशपणें मेजरनं साद घातली.

'जी.'

'एवढा हा कडा चढला कीं—'

'मुक्कामाला आलोंच मेजर. हवालदाराला तें ठाऊक होतं.

'पण—'

'खरं आहे. हा पण मोठाच आहे.'

'तिकडे लढाईला तोंड लागलं आहे. आणि इतके असूनही आपला कांहीं उपयोग नाहीं. इथं असे अडकून पडलोंत आपण. निरुपाय आहे. माघार घेण्याखेरीज गत्यंतर नाहीं.' धर्मवीरानं एका दमांत आपलं दुखः बोलून टाकलं आणि हात चोळत अगतिकपणें तो येरझारा घालूं लागला. त्याला कांहींच करतां येत नव्हतं.

'माघार मेजर?' सावंतानं डिंवचून विचारलं.

'होय. पुढचा मार्ग बंद आहे. तेव्हां मागं जाणं हा एकच'–

'माघार? या ठार दगड–मातीच्या मुडद्यापुढें?'

---

पान २१ वरून...

आठवलं. इतरनांही बरंच कांहीं आठवलं. कुणीतरी दगड उचलला. 'सूं...' करीत तो त्या गर्दींतील एका पोर्तुगिजाच्या डोक्यावर जाऊन आदळला. लाल लाल मानवी रक्त त्याच्या गोऱ्या गोऱ्या देहावर उसळी मारीत उतरूं लागलं. लगेच आणखी दगड भराभर आले. मला येशू ख्रिस्ताच्या हातांतून ओघळणाऱ्या रक्ताची आठवण झाली. मला वाटलं आमचे जवान या जनतेच्या प्रक्षुब्ध कृतीकडे दुर्लक्ष करतील. परंतु क्षणांतच हवेंत गोळीबार झाला. एका लष्करी अधिकाऱ्यानें जनतेकडेच बंदूक वळविली आणि त्यांना इशारा दिला...तो ओरडून म्हणाला,

'हें भेकडपणाचें वर्तन आहे. शरणागतींना भारतीय सेना अशी वर्तणुक कधींच देत नसते...पुनः पोर्तुगिजांवर हात उगाराल तर हात तुटून पडतील तुमचे...'

त्यानें आपल्या तुकड्यांना हुकूम दिला आणि शेंकडों बंदुका पोर्तुगिजांच्या रक्षणार्थ धांवल्या. मी वळून वळून पोर्तुगीज सैनिकांकडे पाहिलं. मला दिसून आलं कीं कांहीं जणांच्या डोक्यांतून रक्त घळघळत होतं पण कित्येकांच्या डोळ्यांतून पाणी ओघळत होतें. ते अश्रू होते. माणुसकींचे कां? पश्चात्तापाचे?...लष्करकोटचा तो मी नेहमी पाहिलेला पोर्तुगीज अधिकारी...त्याचेही डोळे पाण्यानें भरलेले मला दिसले...कीं तो केवळ आभास होता?

शांतादुर्गेच्या शांत, शीतल व सुंदर, पुण्यभूमी, मांडवी नदीच्या काठांवर झालेलं भारतीय जवानांचें हें दर्शन भारताच्या शांतताप्रियतेबरोबरच शक्तीच्या 'दुर्गा' उपासनेचें पण अक्षर प्रतीक नव्हतं कां?—

●●●









'अरे पण कडा किती उचं आहे ? बघ कीं जरा.' धर्मवीरानं सांगितलं.

'थेट स्वर्गाला जाऊन का भिडेना—'

'तसा तो भिडलाच आहे.'

'तरी हा सह्याद्रीचा पठ्या त्याच्या माथ्यावर चढणार.' हवालदारानं जाहीर केलं.

'वेडा का काय ?'

'वेडा का शहाणा तें ठरवूं सवडीनं. तिथं माथ्यावर पोंचलों कीं मग.'

आणि मेजरला सरळ बाजूला गुंडाळून सावन्त आवेशानं पुढं झाला. आवाज चढवून हुकामत गाजवूं लागला. या अशा अडी-अडचणीला उपयोगी पडावं म्हणून कांहीं साहित्य त्यांनीं बरोबर घेतलंच होतं. मोठे खिळे, दोरखंड, हातोडा वगैरे सामानाची जमवा-जमव सुरू झाली.

थोडा वेळ त्यांतच गेला आणि मग हवालदार सावंतानं जवानांना विचारलं, 'तुमच्यापैकीं स्वतःला मराठा म्हणणारे कोण कोण आहेत रे ?'

'मी–मी–' करीत बरेच आवाज उठले.

'अरे हो, हो ! मर्दानो, आता तुमची परीक्षाच आहे.'

'लेखी का तोंडी ?' मध्येंच कुणीसं विचारलं.

'हात् लेका ! अरे, आघाडीवर परीक्षा एकच. मर्दपणाची.' सावंतानं त्याला गप्प बसवलं, 'आहे का तो ? तर पुढं या.'

जवानांना आव्हानच होतं. भराभर तें पुढं झाले. मराठेच नाहींत, तर जाट, रजपूत, शीख–सगळेच ! त्यांच्यांत चढाओढ लागली, चुरस लागली आणि तशी बोलाचाली सुरू झाली.

'हा मराठा नाहीं सावंत. सरदारजी आहे.'

'फिर मर्द है. डरपोक नही.' तो शीख उत्तरला.

'हमभी राजपूत है. कुच कम् नही.' एक रजपूत जवान ग्वाही देऊं लागला. त्यांची ती बाचाबाची हवालदाराला गंमतीची वाटली. त्यांचा उत्साह बघून तो एकदम खुष झाला. मिशांवर हात फिरवीत तो एकदम ओरडला, 'प्रत्येक जवान:मराठाच आहे. झालं, गप्प बसा आतां.' जातीजमातींचीं हीं भांडणं मागं घराकडे ठेवून आघाडीवर येतात. इथं आपण सगळे एक. काय ? चला उद्योगाला लागूं आतां. सखारम मोरे तूं ये माझ्यासंगं. पोरा, कडा कधीं चढला आहेस ' त्यानं सखारामाला विचारलं.

'हा काय प्रश्न झाला हवालदार ?' सखारामानं उलटा प्रश्न केला.

'सरळ उत्तर देणार आहेस का कसं ? बोल.'

'सह्याद्रीच्या पायथ्यालाच गांव आलं आमचं हवालदार. मधाचीं पोळी धुंडत कडेकपारी चढायची संवयच नव्हे जन्माची ?'

'असं म्हणतोस ! मग सांग, चढशील हा कडा हवालदारानं मुद्याचा सवाल केला.

'हा ? चढेन कीं !' कड्याच्या उंचीचा अजमास घेत सखारामानं उत्तर दिलं.

'जरा अवघड आहे. सावधगिरीनं चढायचं–तेव्हां वेळ मात्र बराच लागेल.'

'आणि लेका पाय घसरुन पडला चिरलास तर ?'

'कपाळमोक्ष ! दुसरं काय ?' सखाराम हंसतच म्हणाला, 'पण ती पाळी येणार नाहीं हवालदार. हा गडी लढाईवर निघालाय. अर्ध्यावर असा कामी नाहीं येणार.

तुझ्यासारख्या मर्दांचा बळी घ्यायला हा हवालदार गाढव नाहीं पोरा. हें चढायचं आणि खिळं ठोकायचं काम जातीनं मीच बघतों. तूं फक्त माझ्यामागं रहा. आधाराला अरे काळ आहे, वेळ आहे–काय ?'

असं म्हणून भलेमोठे लोखंडी खिळे आणि हातोडा उचलून हवालदार कामाला लागला.

शतकंच्या शतकं ऊन आणि पाऊस खाऊन पोसलेला कड्याचा काळा फत्तर वरून लोखंडासारखा टणक व चिवट होता. खिळा टिकायलाच जड जात होतं. हातोड्याचे बरेच घाव घालावे आणि ते सुद्धां पुऱ्या ताकदीन तेव्हा खिळा तसूभर आंत जाई. भारी जिकरीचं आणि त्यापेक्षांही कष्टाचं काम होतं. सावन्त जिद्दीनं यांत पडला होता. मराठ्यांची प्रतिष्ठा पणाला लावून. आतां त्याचं इतकं वय झालेलं ! पण गडी भलत्याच ताकदीचा होता. वेळ बराच जात होता. पण एक एक खिळा बसत होता. तो पक्का बसला आहे याची आधी खात्रा करून घेई आणि तेव्हांच हवालदार वर चढे. सावधपणं या खिळ्यावर उभा राहून वरचा खिळा ठोकूं लागे.

खालीं लोक भयचकीत नजरेनं त्यांच्याकडे बघत उभीं होतीं. नसती हुरहूर, नसत्या शंका त्याना बेचैन करीत.

डोंगराच्या पलिकडे लढाई ऐन रंगांत होती. दिसत कांहींच नव्हतं. पण तोफखान्याचा भडीमार जोरांत चालू होता आणि त्याला खळ नव्हती.










# पेरणीचा दीस



आभाळाच्या पाटावर
पावसानं घातलंय् ढगांचं धुणं.
हिरव्या धड्यांच्या काजळीं रानांचीं
शिंतोडं पडल्यावर हरकल्यात मनं.
पाणीं घालणारा येतोय् ढग
वाऱ्यासंगं पळत पळत.
आतोय् गडबडींत वरनं वरनं
पाणी घालायचं गाडगं गाळत
तरवाऱ्यावी वाफ्यांस्नी घालत्यात
झुरझुर उनांत झारीचं पाणीः
(कुणी पोरकट ढग गमतीनं
सुदमुद करत्यात त्येंच्यावाणी.)
...ढगांचीं ढोरं आभाळभर पळवत
ऊन-पाऊस खेळत्यात हिरवळीवर.
कोल्ह्यांचीं लागत्यात लग्नं
ह्याच म्हूर्ताला येऊन वर्दळीवर
...भुसभुसीत वावरांत चाललीया कुरी;
अडक-मोगणा पळतोय् मागनं
(अहो, ही घोड-नवरी वडतीया
हडकुळ्या नवऱ्याला पाठीमागनं)
...खेळांमळीचा पेरणीचा दीस;
मोडलीं तरीबी असल्यास; पेकटं.
सालभर उपाशी ऱ्हायल्यालीं
भरल्यागत वाटतात उपाशी पोटं.

—आनंद यादव

आणि त्यानंच मेजर उद्विग्न झाला होता, उतावीळ झाला होता, खिन्न झाला होता. छेः! हें कांहीं खरं नव्हतं. फार-फार उशीर होत होता. पुन्हा अन् पुन्हा तो घड्याळाकडे बघे. असहाय्यपणें येरझाला घालूं लागे. आपल्याशींच कांहीतरी पुटपुटत राही आणि मध्येंच आठवण झाली कीं हवालदाराकडे बघून उसन्या अवसानानं धीर देई, गुड 'ब्रेहो! कमाल आहे तुझी सावंत...'

हें असं बराच वेळ चाललं होतं.

आणि मग हवालदार सावंत आणि जवान सखाराम मोरे कडा चढून माथ्यावर पोचले तेव्हां खालीं जवानांनीं हर्षानं एकच ओरडा केला. पुढचं काम अर्थातच सोपं होतं. खिळ्याला बांधलेल्या दोरखंडाला धरून माणसं भराभर वर चढलीं. तसं शिक्षणच होतं त्यांना. चढतांना कांहीं वाटलं नाहीं पण वरून खालीं पाहिलं मात्र आणि त्यांच्या काळजांत कच्च झालं. अरे बापरे!

मेजर धर्मवीर आतां खुशींत आला होता. थोडा उशीर कां लागेना पण त्याची तुकडी डोंगर चढून सहीसलामत इथपर्यंत थडकली होती. आणि तेंहि कांहीं कमी नव्हतं.

हवालदाराच्या पाठीवर त्यानं जोराची थाप दिली आणि प्रेमानं तो म्हणाला, 'सावंत, तुझ्या धाडसावर खुष आहे मी. याबद्दल तेजपूरला परतल्यावर खाना. तोपर्यंत—' आणि पॅन्टीच्या खिशांतून त्यानं एक छोटी बाटली काढली.

सावतानं झडप घालून बाटली हस्तगत केली. दांतानीच बूच उडवलें. घटा घटा तोंडाला लावून एका दमांत रिकामी केली.

सगळेच हसूं लागले. मेजर आपला बघतच राहिला आणि मग तो सुद्धां हसूं लागला.

'माफ करा, साहेब, माफ करा.' सगळं झाल्यावर हवालदार आतां माफी मागत होता. भान नाहीं राहिलं. मनावर ताण पडणारं काम केलं कीं हें असंच होतं. बाटलींतील लाल पाण्यासाठीं जीव वेडा होतो.'

आणि तो सर्वांपेक्षां मोठ्यानं हसंत सुटला.

झटपट जेवणं उरकलीं आणि ताजेतवानें होऊन उमेदीनं ते पुढं निघाले. निघायलाच हवं होतं. तिकडे खाली लढाई चालू होती. आपल्या जवानांना कुमक म्हणून ते चालले होते. आधींच खूप उशीर झाला होता. निष्कारण वेळ दवडण्यांत अर्थ नव्हता.

तासभर जंगलांतून पायपीट केल्यानंतर ते जरा मोकळ्या जागेंत आले. इथं वरून दूर पायथ्यापर्यंत सगळा टापू अगदीं स्पष्ट दिसत होता. मेजर धर्मवीराचं तिकडें लक्ष होतंच. त्यानं दुर्बिण घेतली. बारकाईनं तो बघूं लागला.

एव्हांना उन्हं खूप कललीं होतीं. सूर्य पाठीमागं जंगलांत उतरला होता. या प्रदेशांत सांज नाहींतरी लवकर होई. दिवस मावळायला फार फार तर तासाचा अवधी होता!

खालीं पठारावर अगदीं मध्यालाच भारतीय टाणं होतं. त्याला चारी बाजूंनी वेढा घालण्याचा प्रयत्नांत चिनी सैन्य होतं. पूर्व आणि उत्तरेकडे तर ते ठाण्यापर्यंत भिडलेच होते. गनिमांचं सैन्यबल तसं फार नव्हतं. दीड दोनशेंच्या आसपास असेल. पण त्यांच्याकडे जवळच्या पल्ल्याच्या दोन तोफा होत्या. आगीचा वर्षाव करीत त्या पुढंपुढं सरकत होत्या आणि त्या अंधारानं शत्रू सैनिक मोक्याच्या ठिकाणीं दबाव धरून बसले होते.

दुर्बिण हवालदाराकडे देऊन मेजर विचार करूं लागला. त्याच्या तुकडींतील पन्नास जवान आशेनं आणि अपेक्षेनं बघत समोर उभे होते. हा आतां काय सांगतो तिकडे लक्ष देऊन होते, उतावळीनं चुळबुळत.

पण मेजर धर्मवीर गप्पच होता. त्याच्या तोंडून शब्दसुद्धां बाहेर पडेना. तशी सुरवात केली सावंतानं. दुर्बिणीनं परिस्थितीचा अंदाज घेत तो म्हणाला, 'मेजर, अगदीं वेळेवर आलों आपण. खोटी झाली पण एका परीनं तें फायद्याचं झालं बघा.'

धर्मवीरानं त्याला अर्ध्यावर तोडलं, ' फायद्याचं ? '

' नक्की. ठाण्यावर कोंडून पडलेलं असतो, ते बाहेर मोकळे आहोंत- आपल्या जवानांना वाटेल ती मदत द्यायला. '

अर्थात मेजरचं सुद्धां वेगळं मत नव्हतं. पण त्यानं तें बोलून दाखविलं नाहीं. बोलत बसणं त्याला पसंत नसे. प्रत्यक्ष कारवाई त्याच्या दृष्टीनं महत्वाची असे. आणि आतां तर प्रत्येक क्षण मोलाचा होता—प्राणमोलाचा होता. निष्कारण चर्चा करण्यांत वेळ न मोडतां ते तांतडीनं निघाले. दौडत डोंगर उतरूं लागले. नव्या जोमानं, अवसानानं, जिंकण्याच्या ईर्षेनं वाटेंतच मेजरनं आपली योजना हवालदाराला सांगितली. त्याचं मत समजून घेतलं. बारीकसारीक सर्व बाजूंनीं दोघांनीं विचार केला आणि मग चढाईचा आराखडा निश्चित केला. अंदाजाप्रमाणं सगळ्या गोष्टी पार पडल्या तर—पण हवालदाराला तरी खात्री होती.

आणि त्यांच्यापाशीं असलेल्या जवानांची मग दोन तुकड्यांत विभागणी झाली. एका तुकडींत वीस, उरलेले दुसऱ्या तुकडींत. वीस लोकांच्या तुकडीचं नेतृत्व हवालदार सावंताकडं होतं. चढाईची योजना त्यानंच सर्व जवानांना समजावून दिली. नाहींतरी एव्हांना त्यांचा उत्साह शिगेला पोचला होता, आवेशानं ते पेटले होते, आघाडीवर उतरण्यासाठीं उसळत होते, अधीर झाले होते.

थेट पायथ्यापर्यंत न जातां, कांहीं अंतरावर रानांतच त्यांनीं एकमेकांचा निरोप घेतला. तेव्हां मेजर धर्मवीरानं सांगितलं, ' मर्दानों गनिमांना धूळ चारून संकटांत सांपडलेल्या आपल्या बंधूंना वांचविणं तुमचं कर्तव्य आहे. जा, चिनी शत्रूचा नायनाट करा. विजयश्री खेंचून आणा. भारताचं नांव राखा. जयहिंद.'

'जयहिंद'चा उद्घोष करीत हवालदार सावंताची तुकडी डावीकडे घनदाट झाडींत दिसेनाशी झाली. मेजर धर्मवीर आणि त्यांचे सैनिक कांहीं वेळ तसेच उभे होते. आणि मग ते सुद्धां पायथ्याकडे भारतीय ठाण्याच्या रोखानं उतरूं लागले.

सूर्य मावळला होता किंवा मावळण्याच्या बेतांत होता. पश्चिमेला रानांत आग लागावी तसा सांजकडोसा जळत होता. पठारावर दाट सावल्या पसरत होत्या. काळोखाचं साम्राज्य आळोखे पिळोखे देत उठत होतं.

कपटी कारवायांत पारंगत असलेल्या चिनी सेनेनं निकराच्या उठावासाठीं हीच वेळ साधावी यांत आश्चर्य नव्हतं. त्यांनीं तोफखाना बंद केला आणि तसा तोफांच्या भडीमारानं खिळखिळ्या झालेल्या भारतीय ठाण्यावर चाहीकडे दबा धरून बसलेल्या चिन्यांनीं एकदम हल्ला चढवला. ' चुंग को वान झुई, ' चुंग को वान झुई असं ओरडत पिवळीं भुतं त्वेषानं तुटून पडलीं.

ठाण्यावर जवान सावध होतेच. मोर्चे बांधून तयार होते. त्यांनीं कसून प्रतिकार केला होता. एकच धुमश्चक्री सुरू झाली. कुलपी आणि बंदुकीच्या गोळ्यांचा उलटसुलट वर्षाव सुरू झाला.

आणि नेमका याच वेळीं मेजर धर्मवीर आपल्या तुकडीसह ठाण्यावर थडकला.

## भारती, तुलाच मुलगा दिला....

तुझी नि माझी कूस वेगळी मुळीं न वाटे मला
भारती, तुलाच मुलगा दिला ॥ धृ ॥

परचक्राचें आले संकट
त्यांत येथले पापी कंटक
निर्दालन हा करण्या व्यंकट
विजयाचा वध सूर्य तेजला त्याच्या डोळ्यांतला...

माझ्या रक्ताचा, श्रद्धेचा
निश्चयमेरू पिंड तयाचा
हाच आसरा भवितव्याचा
मानवतेस्तव अमृतप्याला त्याच्या हातांतला...

तूंच माउली तूंच पिता गे
तूं कर कौतुक, तूं भर रागे
तुझ्याच अंकीं जीवन जागे
स्वातंत्र्याचा वेद हांसला त्याच्या श्वासांतला...

एक भारती तुझी आरती
हा नच मुलगा ही तर ज्योती
ज्योत पेटवी कोटी ज्योती
मार्ग पुढारी प्रकाशांतला कशास चिंता तुला...

—दत्ता कदम

चिन्यांचं मागं लक्ष नव्हतं. ते बेसावध होते. मूठभर भारतीय जवानांची खांडोळी करण्याच्या पराक्रमांत बेफिकीर होते. आणि धर्मवीराचे जवान शत्रूच्या पिछाडीला रायफल रोखून कडे करून उभे होते. फक्त हुकूमाची वाट बघत.

'फायर!'

त्यांना हवा तो हुकूम मेजरनं दिला. तीस गोळ्या 'सूंसूंऽ' करीत सुटल्या. त्याबरोबर चिनी सैनिकांत उडालेल्या गोंधळाचा पूर्ण फायदा घेण्याच्या उद्देशानं मेजरनं दुसरा हुकूम दिला—

'फॉरवर्ड–हल्ला चढवा!'

याच्या पूर्वीच हवालदार सावंताच्या तुकडीनं उत्तरेकडे तोफखान्यावर अकस्मात चढाव केला होता. तिकडें नांवाला चारपांच सैनिक होते. काय न् कसं हें कळण्यापूर्वीच त्यांचा निकाल लागला. तोफखाना असा विनासास ताब्यांत आला होता.

आणि तसं हवालदाराला नसतं स्फुरण आलं. अवसानानं तो ओरडला, 'एक चारपांच लोक इकडे लक्ष ठेवतील. जीव गेला तरी ठाणा मात्र सोडूं नका. बाकीचे माझ्या मागं या.'

आणि रायफल रोखून तो पुढं घुसला. त्याच्या मागं दहापंधरा जवान धांवत निघाले.

प्रत्यक्ष ठाण्यावर लढाई ऐनरंगांत आली होती. चिनी सेना मध्यकोंडींत सांपडली होती. पुढून आणि मागून भारतीय जवान लचके तोडत होते. पिवळ्या भुतांची त्रेधातिरपीट उडाली होती. संख्येनं त्यांचं बळ भारतियांच्या दुप्पट होतं आणि त्यांच्या बंदुकी अधिक सोयीच्या होत्या. पण हातघाईच्या लढाईत फौजा एकदा अंगाला भिडल्या कीं शस्त्र असून निकामी असतात. सैन्याच्या संख्याबळापेक्षां त्यांची हिंमत आणि ताकद यांचं बळच वरचढ ठरतं.

हें असंच झालं होतं. भारतीय जवान तडक गनिमांवर तुटून पडला. मारूं आणि मरूं या जिद्दीनं त्यांच्या डोळ्यांत रक्त आणि टाळक्यांत युद्ध चढलं होतं. सुरवातीला एकदाच त्यांनीं बंदुका उडवल्या पण बंदुकींत काडतुसं भरायला वेळ लागे आणि चिन्यांकडे तर स्वयंचलित बंदुका होत्या. म्हणूनच जवान बेधडक पुढं घुसले. दिसेल त्या चिन्यावर संगिनीनं वार करीत सुटले. त्याला फाडूं लागले, भोसकूं लागले आणि मग संगिनीसुद्धां फेकून देऊन गनिमाच्या अंगालाच ते सरळ झोंबले. झटपट सुरू झाली. जमिनीवर पाडून चिन्यांचे ते नरडे दाबूं लागले, डोळे फोडूं लागले, बुटांच्या पायांनीं त्यांना तुडवूं लागले. जोरदार हाणामारी चालली होती. भयंकर–भयंकरच. रक्ताचे पाट वहात होते. मुडद्यांची रास पडत होती......

युध्द–हें युध्द होतं!

माणसाला इथं किंमत नव्हती. त्याच्या मुडद्यालासुद्धां नव्हती...

भारतीय जवानांनी शर्थ केली. लढा जिंकला. त्यांची सरशी झाली. ठाण्यावर आनंदीआनंद झाला होता. विजयानिमित्त खास खाना तयार होत होता. बाटल्या फुटत होत्या. ट्रान्झिस्टरवर फिल्मि गाणीं चालू होतीं. भसाड्या आवाजांत कुणी ताल धरीत होता. जवान हर्षानं नाचत होते, गात होते, हंसत खिदळत होते. तावातावानं आपापल्या पराक्रमाच्या बाता मारीत होते.

हवालदार सावंत रंगलेल्या बैठकींतून मध्येंच दचकून उठला.

'काय झालं हवालदार?' सखाराम मोरेनं विचारलं.

"बाहेर 'पाणी पाणी' म्हणून कण्हतय् कुणीतरी." त्यानं सांगितलं.

'हूं:! बसा खालीं. कण्हतोय् तो मर म्हणावं लवकर. कोल्हींकुत्रीं येण्यापूर्वी' कुणीसं म्हटलं.

'अरे, पण कोणी मरणाच्या दारांत'—

'आपल्यापैकीं बाहेर कोणी नाहीं हवालदार. सगळ्यांना उचलून आंत आणण्यांत आलं आहे. कामी आलेल्या जवानांची प्रेतंसुद्धां.' मोरे सांगूं लागला.

पण त्याला अर्ध्यावर तोडत हवालदार ओरडला, 'टाळकी फिरलींत तुमचीं. माणसान आपला धर्म सोडून चालेल काय रे पोरांनो? सखाराम तो लोटा दे. मी निघालों.

आणि हवालदार सावंत लोटा घेऊन बाहेर काळोखांत धडपडत पाण्यासाठीं शुष्क कंठानं टाहो फोडणाऱ्या जखमी चिनी सैनिकाचा शोध करूं लागला.









*युद्ध आघाडीवरील वीरांच्या या शौर्यकथा. विजयगानासाठीं सज्ज असलेल्या बहाद्दुरांच्या गौरवाला वाहिलेलीं हीं दोन पानें*

—चंद्रकांत गुप्ते

भारतावर चीननें केलेलें आक्रमण हें जितकें विश्वासघातकी आहे तितकेंच तें भारताच्या दृष्टीनें फायद्याचेंहि ठरलें आहे. फायद्याचें अशासाठीं कीं पंचशील आणि सहकारी सहजीवन अशा गोंडस नांवाखालीं मैत्रीचा हात सदैव पुढें करणारें भारताचे शेजारी कसे आहेत हें भारताला समजून आलें हें एक. दुसरें म्हणजे युगाच्या शस्त्राशीं युगाच्या शस्त्रानेंच लढत दिली पाहिजे, 'शस्त्राघाता शस्त्रची उत्तर' ही जाणीव भारताला या आक्रमणामुळें झाली. भारत हा शांतताप्रिय देश असल्यामुळें आणि स्वातंत्र्यप्राप्तीपासून भारताचें धोरण हें शांततावादी असेंच असल्यामुळें भारतानें आपल्या शस्त्रबलाकडे आणि सैन्यबलाकडे फारच कमी लक्ष पुरविलें होतें. परंतु चीनच्या या विश्वासघातकी आक्रमणामुळें याबाबत आपण शिथिल राहिलों ही चूक झाली हें भारताच्या शासकांना कळून चुकलें. आपल्याला कुणी शत्रु निर्माण होतील आणि आपल्यावर हल्ला करण्याइतकी त्यांची मजल जाईल हें भारताच्या कधीं मनांतही आलें नाहीं आणि त्यामुळें शस्त्रबळाच्या आणि संरक्षणाच्या सामर्थ्याच्या बाबतींत भारत सदैव बेसावधच राहिला. अशा परिस्थितींत चीननें केलेल्या या रानटी आक्रमणामुळें भारतीय सैन्याची कसोटीच लागली. तशांतच हें आक्रमण समुद्रसपाटीपासून ८ ते १७ हजार फूट उंच अशा ठिकाणीं झालें. इतक्या उंच जागीं झालेली जगांतील ही पहिलीच लढाई होय. भारतीय सैनिकांना तर अशा प्रदेशांत लढण्याचा परिस्थितीमुळेंहि आणि भारताच्या शांततावादी धोरणामुळेंहि कधींच प्रसंग आला नव्हता, आणि येईल असेंहि कधीं भारताला वाटलें नव्हतें. या सर्व प्रतिकूल परिस्थितींत भारताच्या सैनिकांनीं जें उत्तम मनोधैर्य दाखविलें तें पाहून भारताच्या या शूर शिपायांपुढें आदरानें आपलें मस्तक नमल्याशिवाय रहात नाहीं. या प्रतिकूल परिस्थितींत भारताच्या शूर शिपायांनीं दाखविलेलें शौर्य खरोखरच उठून दिसतें.

गृहमंत्री श्री. लालबहादुर शास्त्री यांनीं नोव्हेंबरच्या उत्तरार्धांत आसामें या सरहद्दीवरील राज्याचा जो दौरा केला त्यावेळीं त्यांना सांगण्यांत आलेली एक हृदयद्रावक कहाणी हें आमच्या शूर जवानांमधील ज्वलंत देशाभिमानाचें एक उत्तम उदाहरणच आहे.

शत्रु पक्षाकडील आठ गोळ्यांमुळें शरीराची चाळण झालेला एक भारतीय जवान हॉस्पिटलमध्यें अत्यवस्थ स्थितींत होता. या जवानाची प्राणज्योत मालवण्यापूर्वी तो सारखा म्हणत होता, 'मला लौकर बरें झालें पाहिजे. मला पुन्हां आघाडीवर जाऊन आणखी कांहीं आक्रमकांचे प्राण घेतले पाहिजेत.' या अनामिक वीराची ही कहाणी ऐकल्यावर पानिपतच्या युद्धांतील दत्ताजी शिंदे यांच्या 'बचेंगे तो और भी लडेंगे' या उत्तराची आठवण कोणाला झाल्यावाचून राहिल !

दि. २० ऑक्टोबर रोजीं नेफा विभागांतील एका लहानशा भारतीय ठाण्यावर अनपेक्षितरीत्या चिनी सैनिकांनीं मोठ्या संख्येनें हल्ला केला असता तेथील भारतीय जवानांनीं त्याला धैर्यानें कसें तोंड दिलें व तो हल्ला कसा परतवून लावला त्याची हकिगतहि मोठी चित्तथरारक आहे.

चिन्यांनीं हल्ला केलेलें हें भारतीय ठाणें समुद्र सपाटीपासून नऊ हजार फूट उंचीवर नामका चू या नदीच्या पुलावर बसलेलें होतें. त्यांच्यापासून थोड्याच अंतरावर चिनी सैनिक खंदक खणून बसलेले होते. हा हल्ला होण्याच्या आदल्या दिवशीं त्या भागांत चिन्यांच्या हालचाली दिसत होत्या. पण त्यापूर्वी मात्र अनेक वेळां हे चिनी सैनिक अगदीं भारतीय ठाण्यांजवळ हिंदींत 'हिंदी चिनी भाई भाई' अशा घोषणा करीत व भारतीय प्रदेश बळकाविण्याचा आमचा हेतू नाहीं असें हिंदी सैनिकांना सांगत असत. पण भारतीय ठाणें असलेला तो प्रदेश चीनचा असल्यानें भारतीय सैनिकांनी तो खालीं करावा असेंहि ते भारतीय सैनिकांना सांगत असत. पण यावर, चिन्यांनीच येथून निघून जावें असें उलट भारतीय जवान सांगत असत.

त्यानंतर दि. २० ऑक्टोबर रोजीं पहाटे पांच वाजतां या ठाण्यावर चिन्यांनीं स्वयंचलित शस्त्रें, मॉर्टर्स, ९ एम्. एम्. च्या बंदुका यांच्यानिशी एकदम जोरदार हल्ला केला. चिन्यांचें सैन्य दोन बटालियनहूनहि अधिक होतें. शेवटीं नाइलाजानें भारतीय जवानांना ठाणें खालीं करून तेथून माघार घ्यावी लागली. तत्पूर्वी एक तरुण सिग्नल लेफ्टनन्ट, इतर चौघे अधिकारी व पन्नास जवान यांनीं तें ठाणें वाघासारखें लढविलें होतें. शेवटीं त्या ठाण्यापासून तीन तासाच्या पायपिटीवरील एका ठिकाणापर्यंत त्यांनीं माघार घेतली. माघार घेतांना शत्रूच्या हातीं लागू नये म्हणून त्यांनीं आपली सिग्नलिंगची सामुग्रीहि नष्ट करून टाकली. ती रात्र उघड्यावरच काढून त्यांनीं दुसऱ्या दिवशीं सकाळीं तेथून सुमारें २० मैलांवर असलेल्या तवांगच्या दिशेनें कूच केलें. घनदाट अरण्यें व दुर्गम पर्वतश्रेणी पार करून अगदी विकलांग अवस्थेंत ते अशा रीतीनें तवांगनजीक जाऊन पोहोंचले. उपासमार व तहानेनें व्याकूळ झालेल्या या शूर जवानांना त्याच अवस्थेंत हें अंतर तोडायला चार दिवस लागले. थंडीवाऱ्याची पर्वा न करता सर्व दिवसभर चालत आणि रात्रीं जेथें पोहोंचत, तेथें घनदाट अरण्याची भीति न बाळगतां ते विश्रांती घेत. जगण्याच्या व शत्रूशीं पुन्हा लढा देण्याच्या इच्छेमुळें त्यांना नवीन शक्ति मिळत असे. अखेरीस एकदांचे ते तवांगच्या पश्चिमेस १८





अनुक्रमणिका

**मैलांवर** असलेल्या लूम-ला येथील मनुष्य वस्तीत येऊन पोहोचले व तेथें त्यांना अन्न मिळालें. आणि मग लौकरच ते तवांग येथें आपल्या साथीदारांना जाऊन मिळाले. तोफांवरील चौघा जवानांच्या एका पथकानें तर चिन्यांनी त्यांचे ठाणें काबीज केल्यानंतर आपल्या दोन तोफा मुख्य ठाण्यावर ओढत ओढत नेल्या.

हिमवृष्टि, गार वारे, उपासमार, घनदाट जंगलें, दुर्गम पर्वतश्रेणी व तहानेमुळें आलेली व्याकुळता या कशाचीहि पर्वा न करता या जवानांनीं सतत चार दिवस जें दिव्य केलें तें खरोखरच आपल्या जवानांच्या शौर्याचें प्रतीक ठरल्याशिवाय व इतिहासांत तें अजरामर झाल्याशिवाय राहणार नाहीं.

दि. २१ ऑक्टोबर रोजी पानगॉग सरोवराच्या प्रदेशांतील एका भारतीय ठाण्यावर अकस्मात हल्ला करून चिनी सैनिकांनीं पकडलेल्या पण त्यांच्या हातावर तुरी देऊन पळालेल्या तुलसी रामा थापा या आमच्या जवानानें दाखविलेलें शौर्य तर अपूर्व असेंच आहे. त्या दिवशीं भल्या पहांटेपासूनच चिन्यांनीं आमच्या या ठाण्यावर मोटा हल्ला सुरू केला होता. परंतु आपला उद्देश सफल होत नाहीं असें पाहून चिन्यांनीं रणगाडे आणले व आपलें हें ठाणें उध्वस्त केलें. हा हल्ला कित्येक तास चालू होता. इतकें झालें तरी शूर थापा हा आपल्या जागेवरून एक तसुभरही हलला नव्हता. आपल्याजवळ कांहींच दारूगोळा उरलेला नाहीं हें पाहून या आमच्या गड्यानें हातघाईची लढाई सुरू केली. या लढाईंत आणखी कांहीं चिनी सैनिकांना कंटस्नान घातल्यानंतर हा थापा चिनी सैनिकांकडून पकडला गेला. यानंतर थापाला निःशस्त्र करून सहा चिनी सैनिकांनीं त्याला आपल्या मुख्य ठाण्यावर नेण्यास सुरुवात केली. त्यावेळीं टेकडीवरील एक चढण चढत असता थापा त्या चिनी सैनिकांच्या हातून निसटला. ती रात्र त्यानें एका नाल्यांत बसून काढली व नंतर उजाडल्यावर सरपटत सरपटत व मोठ्या कपारीचा आडोसा घेत घेत तो ती टेकडी चढून गेला. त्यानंतर दोन दिवस अन्नपाण्याविना एकसारखा चालल्यावर त्याला एक भारतीय पथक दिसलें. त्याबरोबर दोन्ही हात फडकावित तो धावत टेकडी उतरून आली व त्या पथकाला मिळाला.

नेफा विभागांतील एका अपरिचित जंगलांत वाट चुकलेल्या व तेथील भयानक थंडीत तीन दिवस अन्नपाण्यावाचून राहिलेल्या दोघां सैनिकांनीं व एका लष्करी अधिकाऱ्यानें पावाचा एक लहानसा तुकडा तिघांनीं वाटून घेऊन कसा खाल्ला व आपले प्राण कसे वाचविले त्याची हकिगतही अंतःकरण पिळवटून टाकणारी आहे. हा अधिकारीहि तीन दिवस उपाशी होता. त्या जवानांनीं त्याला आपल्यातील पाव खाण्यास देऊन त्याचे प्राण वाचविले. तर त्या अधिकाऱ्यानें त्या जवानांना जवळच्याच एका भवधबधब्यावर नेऊन त्यांना पाणी मिळवून दिलें. हे दोघेहि जवान तीन दिवस पाण्याचा शोध करीत होते व तहानेनें त्यांचा प्राण जाण्याची वेळ आली होती. या अधिकाऱ्याची भेट झाली त्यावेळीं चिन्यांच्या कुलपी गोळ्यांच्या ठिकऱ्यांनीं जखमी झालेले हे दोघे जवान आपल्या ठाण्यावर परत जाण्याचा मार्ग शोधण्याचा प्रयत्न करीत होते. त्या अधिकाऱ्याचा अनुभव तर याहून कटू होता. तो दि. २४ ऑक्टोबर रोजीं आतल्या ठाण्यावरून तवांगला परत आला होता. परंतु आपल्या सैन्यानें व मुलकी अधिकाऱ्यांनीं तवांग शहर खालीं केलें असल्याचें त्याला आढळून आलें. शेवटीं चिनी गनिमांबरोबर लपंडावाचा खेळ खेळून तो जंगलाच्या प्रदेशांत आंत शिरला होता. शेवटीं त्या दोघां जवानांबरोबर पाव खाल्ल्यावर त्यानें त्या दोघां जखमी सैनिकांना जवळच्याच एका कँप हॉस्पिटलमध्यें नेऊन सोडलें.

**आम्हाला सूड उगवूं द्या !**

लडाखच्या सरहद्दीवरील दोन जवानांच्या मर्दुमकीची हकिगतहि अशीच चित्तथरारक आहे. हे दोघे जवान खिंडीवरच्या एका ठाण्यावर चिनी आक्रमकांना कडवा प्रतिकार करीत होते. ते दोघे ज्या खंदकात होते व त्यावर चिन्याच्या तोफा आग ओकीत होत्या. त्या दोघांनाहि अनेक जागीं जखमा झाल्या व त्यांचा नॉन-कमिशण्ड अधिकारी तर जागच्या जागींच ठार झाला. तरीहि या दोघां जवानांनीं प्राणांची पर्वा केली नाहीं कीं आपली जागा सोडली नाहीं. उलट समोरून चाल करून येणाऱ्या चिनी पथकांवर त्यांनीं सतत गोळीबार चालू ठेवला. चिनी प्रत्यक्ष त्या खंदकाच्या जवळ येऊं लागेल तेव्हां पाठीमागच्या ठाण्यावर जातां यावें म्हणून त्यांनीं जवळून गोळीबार चालू ठेवला. तेथून ते तळावर आले. दुसऱ्या दिवशीं त्या तळावर हल्ला झाला तेव्हां या दोघां जखमी वीरांना मागच्या बाजूनें हलविण्यांत आले. तो मार्ग लांबचा होता. रक्तानें माखलेले असतांनाहि कडाक्याच्या थंडीला न जुमानता ते बहाद्दूर पायी चालत दोन दिवसांनीं मागल्या ठाण्यावर येऊन पोहोंचले. तेथून मग हेलीकॉप्टरनें त्या दोघांना इस्पितळांत हलविण्यांत आलें. शत्रूला निधड्या छातीनें तोंड देणाऱ्या या वीरांनी आपल्या अंगावरील जखमा भरून येतांच 'चिन्यांना खडे चारण्यासाठीं आम्हांला परत आघाडीवर पाठवा' असा हट्ट धरला.

**अमर बहादूरसिंग**

दि. २१-२२ ऑक्टोबरच्या रात्रीं कुमोव रेजिमेन्टचा नाईक बहाद्दुर सिंग नेफा विभागांतील किबितू विभागांतील मॅकमहोन रेषेवरील आघाडीवरच्या खिंडीच्या ठाण्यावरील एका तुकडीचें नेतृत्व करीत होता. मध्यरात्रीच्या सुमारास पुष्कळशा चिनी सैनिकांनीं मध्यम पल्ल्याच्या मशिनगन्स व उखळी तोफा यांचा बहाद्दुर सिंगाच्या तुकडीवर हल्ला केला. बहाद्दुरसिंग व त्याचे सैनिक यांनीं मोठ्या धैर्यानें लढा देऊन चिन्यांचे बरेच बळी घेऊन हा हल्ला परतवून लावला. त्यानंतर थोड्याच वेळानें शत्रूनें पुन्हां दुसरा हल्ला केला. जेव्हां मशिनगनवरील एक नंबरचा सैनिक बळी पडला तेव्हां बहद्दुर सिंगानें स्वतः ती मशिनगन चालविण्यास घेतली व शत्रूला निर्भयपणें तोंड देऊन ठाण्याचें संरक्षण केलें. बरीच हानि होऊनहि बहाद्दुर सिंगाच्या कांहीं मूटभर जवानांनी बहाद्दुर सिंग शत्रूपक्षाच्या गोळीस बळी पडेपर्यंत तें ठाणें आपल्या ताब्यांत ठेवलें होतें. बहाद्दुर सिंगाच्या या अतुल पराक्रमाबद्दल राष्ट्रपतींनीं त्याला मरणोत्तर वीरचक्र जाहीर केलें आहे

( क्रमशः )









*व्यासांचा उपदेश धृतराष्ट्र मध्येंच तोडतो. म्हणतो— जग हें स्वार्थावर चालतें हें तुम्हांला माहित नाहीं काय ? लोक आपल्या स्वार्थाला अनुकूल असाच निर्णय घेतात. मीहि माणूसच आहे. संत नव्हे !*

# आज पांडवांचे आदर्श पुन्हा तपासून घ्यावयास हवेत !!

**विद्धि लोकात्मकं मांच २५**

**मी माणूस आहे, संत नव्हे**

आज कलियुग आहे; युधिष्ठिरकालापूर्वी द्वापारयुग होतें; युगायुगांत मनुष्याचे स्वभाव बदलतात; आज माणसें स्वार्थी झालीं आहेत; पूर्वी नव्हतीं; असें आपण मानतों. खरें म्हणजे या म्हणण्यांत मुळींच अर्थ नाहीं. मनुष्य स्वभावाचें मूलस्वरूप जसें कृतयुगांत होतें तसेंच आजवर चालले आहे. त्रेतायुगांतील कैकेयी या सावत्र मातेपेक्षां आजच्या सावत्र माता वेगळ्या नाहींत. द्वापारयुगांतील सत्तांध दुर्योधनापेक्षां आजचे सत्तांध लोक वेगळे नाहींत. मनुष्याचा मूलस्वभाव हा परमेश्वरा-इतका चिरतन आणि चिरंजीवी आहे. त्यांत बदल होणार नाहीं. फक्त बाह्य उपाधींमध्यें मात्र बदल पडेल पण मूळ स्वभाव बदलणार नाहीं.

अनेकदां दुसऱ्याच्या वर्तनांत दोष काढणारे, त्यांना उपदेश करणारे उपदेशक या गोष्टी लक्षांत घेत नाहींत. त्यामुळे त्यांचा उपदेश व्यर्थ जातो, निरर्थक ठरतो जो मनुष्य स्वभावाचीं मुलतत्वें विचारांत घेऊन केला जातो तोच उपदेश यशस्वी टरतो. पण नेमकी याच गोष्टीचां विस्मृति आपणांस नेहमीं पडत असते.

भारतीय युध्दाचे ढग जमा होऊं लागले तेव्हां धृतराष्ट्र हा उपदेशकांचा मोठाच आधार टरला. नाना प्रकारचे लोक येऊन त्याला नाना प्रकारचा उपदेश देऊं लागले. धृतराष्ट्र हा उपदेश ऐकून घेत होता आणि तसाच सोडून देत होता. त्याची स्वतःची या बाबतींत भूमिका काय होती ?

कौरवांचें राज्य हें विचित्रवीर्याचें होतें. धृतराष्ट्र हा विचित्रविर्याच्या ज्येष्ठ पत्नीचा ज्येष्ठ मुलगा. तो राज्याचा वारस. पण तो आंधळे-पणानें उणा असल्यानें सारी सत्ता पंडूच्या हातीं राहिली. याबद्दल त्याच्या भावना काय बरें असतील ? त्यानें या गोष्टीस शरण जावें काय ? अर्थात दैवयोगानें नाइलाज म्हणून जरी तो बाह्यात्कारी जरूर तेवढा शरण गेलेला असला तरी या परिस्थितीशीं जुळतें घेणें त्याला मनांतून शक्य नाहीं. कारण हें जीवन सुखाचें नाहीं. एखादा यज्ञ करावयाचा झाला तरी पंडू त्यासाठीं धन आणून देणार तेव्हांच तो यज्ञ होणार. धृतराष्ट्र डोळस असता तर त्यानें पंडूला धन आणा-वयास पाठवलें असतें. पण तें राजाज्ञा देऊन. पंडूही निमुटपणें गेला असता तो राजाज्ञा पालनासाठीं. आतां पंडू जाणार तो मनांत आलें तर व धृतराष्ट्रास तें धन मिळणार पंडूची इच्छा असली तर. अर्थात् यांत लाचारी आली. पंडूने धृतराष्ट्राचें सारें कांहीं केलें खरें पण तरीही त्यांत धृतराष्ट्रास समाधान लाभणें शक्य नाहीं.

अशा परिस्थितींत दोघांनीही लग्नें झाल्यावर धृतराष्ट्राचें लग्न अगोदर होऊनही त्याला मुलगा मात्र मागाहून झाला. तो पुत्र कुयोगावर उत्पन्न झाला आहे. त्याचा त्याग करावा असें लोक सांगूं लागले. पण कुयोगावरही उत्पन्न झालेल्या पुत्राचा त्याग करणें सोपें नाहीं. अर्थात् धृतराष्ट्रानें आपल्या पुत्राचा त्याग केला नाहीं. उलट लोक त्या पुत्राच्या नाशाची विवंचना करीत असतां धृतराष्ट्र प्रश्न करीत होता. ' हा माझा पुत्र राजा होईल ना ? '

**आत्माराम नीलकंठ**











‘ सर्वस्व ’ दान




छे, छे, अशी किरकोळ देणगी काय मागतां—मी तर सर्वस्व देणाऱ्या मताचा आहे !! हँ. हँ. हँ.

या प्रश्नांत धृतराष्ट्राच्या मनांतील अथांग आर्तता, काकुळत भरलेली आहे. आपण राजे असलों तरी सत्ता आपल्या हातीं नाहीं. ती आपल्या नाहीं तरी आपल्या पुत्राच्या नशिबास लाभणार ना ? कीं पंडूचा पुत्र एक वर्षानें वडील म्हणून या पिढींत आपल्या वाट्यास आलेलें दुर्दैव पुढील पिढींत आपल्या पुत्राच्या वाट्यास येणार आहे ? अशी काळजी त्याला खात होती.

पुढें स्वतः पंगू असतांनाच आणि पुत्र बलवान होण्याच्या अगोदर शिष्टांच्या आग्रहानें त्याला युधिष्ठिरास युवराज म्हणून अभिषेक करावा लागला. तेव्हां त्याला काय वाटलें असेल बरें ? आजवर पंडूची स्तुती ऐकून त्याचे कान किटले होते. होस हो ठोकून त्याचे ओठ किटले होते. तेंच भाग्य पुत्राच्या वाट्यास आलेलें पाहून त्यास इंगळ्या टोंचल्या असणार. पण तो अगतिक होता. मनांत आलें तें मुखानें बोलणें त्याला शक्य नव्हतें. तेव्हां पांडवांना वारणावतांत जाळून त्यांचा कांटा काढावयाचा बेत कौरवांनी केला. त्यास त्यानें जमलें तें अप्रत्यक्ष साह्यच केलें.

पण धृतराष्ट्राचें दैव एवढें सबळ नव्हतें. वारणावतांतून निसटलेले पांडव, द्रौपदीस जिंकून, इतर राजांचें पाठबळ मिळवून, कृष्णाच्या मदतीनें परत आले. त्यावेळीं राज्याची वाटणी करण्याची प्रथा नसूनही नाइलाजानें त्यानें अर्धे राज्य पांडवांस तोडून दिलें. दुर्योधन आतां वयांत आला होता. पण अजूनही मोठ्यांस धुडकावून लावावें असा आत्मविश्वास त्याला नव्हता. त्यामुळें धृतराष्ट्र आणि दुर्योधन उभयता नाइलाजानें स्वस्थ बसले. पुढें दुर्योधन सबळ झाल्यावर त्याला ही अगतिकतेनें दिलेली वाटणी आणि पांडवांचा उत्कर्ष सहावेना. त्यानें या ना त्या उपायानें तें राज्य घ्यावयाचें ठरवून त्याप्रमाणें तें परत घेतलें. त्यावेळीं धृतराष्ट्राची मनोभूमी सुदरपणें दिसून येते. शकुनीनें ‘जिंकलें’ असें म्हटलें, कीं ओरडून तो आनंदानें विचारतो, ‘ काय ? काय जिंकलें ? सांगा. सांगा ’ पण द्रौपदी विटंबनेनंतर त्याला शिष्टांची भीतीही वाटूं लागते. भीमाच्या सूडाच्या गर्जना ऐकून तो टरकतो आणि तें जिंकलेलें सारें परत करतो. पण लगेच दुर्योधनानें द्यूतास पुन्हां परवानगी मागितल्यावर तीही देतो. अगतिकपणें आपणाकडून गेलेलें अर्धें राज्य पुत्रास परत मिळावें अशी त्याला तळमळही असते. पण त्यांतून पुत्रावर संकट येणार नाहीं अशी खात्री नसते. तेव्हां त्याच्या मनाची इकडून तिकडे आंदोलनें चाललेली असतात. धरसोड चाललेली असते. हें त्याच्या परावलंबी परिस्थितीस साहाजिक नव्हे काय ?

पुढें दुर्योधन सत्तेवर स्थिर होतो. लोकप्रिय होतो. युद्धाचा प्रसंग आला तेव्हां पांडवांच्या सात अक्षौहिणींच्या ऐवजीं अकरा अक्षौहिणी लोक त्याच्या छत्राखालीं उभे रहातात. पुत्रानें स्वतःच्या मतानें चालून आजवर आपलें कल्याणच केलेलें असतें. त्याच्या कर्तृत्वावर सर्वांचा विश्वास बसलेला असतो. अशा वेळीं लोक धृतराष्ट्राला पुन्हां उपदेश करतात, ‘ या पुत्राचा त्याग कर. युद्ध टाळ. ’

आजवर मन मारून मारून उपदेश ऐकत बसलेला धृतराष्ट्र अंतीं सणसणीत उत्तर देतो आणि तेंहि आपला बाप व्यास याला. व्यासाचा उपदेश चालू असतांनाच धृतराष्ट्र त्याला मध्येंच तोडतो आणि म्हणतो, पिताजी तुम्ही सांगत आहांत त्या साऱ्या गोष्टी मला माहीत आहेत. पण हें जग चालतें तें आपल्या स्वार्थावर चालतें हें तुम्हांला माहीत नाहीं असें दिसतें. लोक आपल्या स्वार्थाला अनुकूल असाच निर्णय नेहमी घेत असतात.मला तुम्ही चार लोकांतलाच एक समजा ( विद्धी लोकात्मकं, मांच ).
‘ मीही माणूसच आहे ’ संत नव्हे.

धृतराष्ट्राचें हें सणसणीत उत्तर ऐकतांच उदात्त वर्तनाबद्दल चाललेला व्यासांचा उपदेश खाडकन् बंद पडला. त्यांना काय होणार हें कळून चुकलें. त्याला उपाय नाहीं हेंही कळून चुकलें. तसें पाहिलें तर धृतराष्ट्राचा तरी याला काय उपाय होता ? मनुष्य स्वभाव हा नेहमीं जसा असावयाचा तसाच त्याचाही विचाऱ्याचा होता.

## पुत्रो मे पुरुषाधमः २६

## हा दुर्योधन महापातकी होता

मनुष्याच्या स्वार्थी वृत्तीस अनुसरून, धृतराष्ट्रानें युद्ध टाळावयाचा सल्ला उधळून लावला. पुढें युद्ध चालू झाल्यावर त्याचें वर्तमान जाणण्याची मनुष्य सुलभ जिज्ञासा भागविण्यासाठीं त्यानें संजयाची नेमणूक केली. संजय हा स्वतः एक सैनिक असून समरांगणावर लढत होता. तेथें एकादी महत्वाची घटना घडली कीं जाऊन धृतराष्ट्रास निवेदन करणें हेंही काम त्याच्याकडे होते. ( त्याला दिव्यदृष्टि वगैरे कांहीं नव्हतें ) अशा घटनांमागून घटना त्याच्या कानांवर येऊं लागल्या तेव्हां धृतराष्ट्राला ब्रह्मांड आठवलें. पूर्वी ज्या तोऱ्यांत त्यानें ‘ मी माणूस आहे, संत नाहीं ’ असें आपल्या बापास ठणकाविलें होते तो तोरा आतां गळाला. पण तो संत नव्हता, माणूस होता हें पुन्हां एकदां सिध्द झालें. दुर्योधन मृत्यू पावला ही शेवटची दारुण घटना त्याच्या कानावर गेली तेव्हां खरें म्हणजे त्याला एक दुःख आणि दुःखच व्हावयास हवें होतें. पण त्या दुःखाशीही मागें सारून तेव्हां






त्याच्यासमोर उभा राहिला तो स्वार्थ. केवळ संपूर्णपणें नागडा ऐसा वैयक्तिक स्वार्थ.

आपलें आतां पुढें काय होणार ? भीष्म गेला. द्रोण गेला. दुःशासन गेला. कर्ण गेला. शकुनी गेला. आपले शंभर पुत्र गेले. आपली अकरा अक्षौहिणी सेना गेली. एका दासीपुत्राशिवाय आपलें नांव सांगावयास कोणी उरलेला नाहीं. आणि तो दासीपुत्र सुध्दां युधिष्ठिरास वश झालेला आहे. आपण अनाथ झालों. गांधारी अनाथ झाली. आपल्या घरांत शेकडों स्त्रिया विधवा झाल्या. आपला पुत्रच नव्हे तर नातूही शिल्लक राहिलेला नाहीं. आपले सचीव उरलेले नाहींत. सेनापती नाहींत. मंत्री नाहींत. सेवक नाहींत. भाट नाहींत. बंदीजन नाहींत. दासी नाहींत. राज्य नाहीं. खावयास उरलें नाहीं. ल्यावयास उरलें नाहीं. आपलें पुढें काय होणार ?

युधिष्ठिर राजा झाला म्हणजे आपली स्थिती काय ? जुन्या पिढींत पंडूनें आपली अदब राखली. पुढील पिढींत ती पांडव राखणार काय ? युधिष्ठिर कदाचित् लोकलज्जेस्तव ती राखील. नाहीं म्हटलें तरी तो अमर्षशून्य आहे. पण अर्जुन ! आणि भीम ? बापरे ! यापुढें भीम माझी काय अवस्था करील बरें ?

या कृतांतानें माझे शंभर पुत्र मारले ? संजया, खरेंच यानें एकट्यानें माझे शंभर पुत्र ठार केले ? एकही-एकही पुत्र माझ्यासाठीं ठेवला नाहीं ? खरेंच का एकही नाहीं ? खरेंच सारे शंभरच्या शंभर पुत्र ठार केले आणि एकट्या भीमाने ? ही गोष्ट झाली तरी कशी ? तुम्ही होऊं तरी कशी दिली ? भीष्म काय करीत होता ? द्रोण काय करीत होता ?

भीम का दुःशासनाचें रक्त खरोखरच प्याला ? आणि हें सांगावयास येतांना तुम्हांला लाज वाटली नाहीं ? दुःशासनाचें रक्त प्यालें जात असतां तुम्ही काय करीत होता ? कर्ण काय करीत होता ? ज्याला दुःशासनासारख्या युवराजाचें रक्षण करतां येत नाहीं तो कसला सेनापति ?

दुर्योधनाच्या कपाळावर लाथा मारीत भीम खरोखरच का नाचला ? परंपरेनें पुनीत असा पवित्र मुकुट ज्या मस्तकावर विराजमान झाला होता, सप्ततीर्थांचीं स्नानें ज्या मस्तकावर घडलेलीं होतीं, जें मस्तक चुकूनही कधीं कुणासमोर वाकलें नव्हतें, तें मस्तक धुळींत ठोकरून का भीम त्यावर थैयथया नाचला ?

'आतां हा भीम पुढें काय करणार ? माझी अवस्था पुढें काय होणार ?' असा प्रश्न त्याच्या मनांत आला. एकादी गोष्ट यशस्वी झाली तर ती मी केली असें म्हणावयाचें आणि ती अपयशी झाली तर तिचें खापर दुसऱ्यावर फोडावयाचें हा लोकस्वभाव आहे. युद्ध टाळावयाचे प्रयत्न चालू असतां 'मी चार लोकांप्रमाणें माझा स्वार्थच पहाणार' असें ज्यानें व्यासाला ठणकाविलें होतें त्याचा स्वार्थ पुन्हां जागा झाला. आणि त्याच्या मुखातून उद्गार निघाले, 'पुत्रो मे पुरुषाधमः ॥' माझा पुत्र दुर्योधन अत्यंत अधम होय. तरी मी त्याला सांगत होतों कीं 'बाबा असें करूं नकोस. युधिष्ठिराशीं मिळतें घे. त्याला त्याचें राज्य देऊन टाक.'

ज्या दुर्योधनास कुठें ठेऊं आणि कुठें नको असें धृतराष्ट्रास मनांतून होत असे; तो विजयी होता तर धृतराष्ट्र त्यास शिरावर घेऊन नाचता, त्याच्याच पराजयातून सर्वनाश उभा रहातांच, धृतराष्ट्र त्याच्या डोक्यावर दोषाचें खापर तात्काळ फोडावयास सिध्द झाला.

यांत दुर्योधनाचाच सारा दोष नाहीं हें त्याला कां तेव्हां सुचलें नसेल ? आपणच दुर्योधनाला या मार्गावर नेलें; पांडवांस जाळावयाच्या बेताला आपण सहकारी झालों; द्यूतांत पांडव हरले तेव्हां आपणास आनंदाच्या उकळ्या फुटल्या त्या आपण आवरूंही शकलों नाहीं; द्रौपदी विवस्त्र होत असतां आपण पुत्रांस आवरलें नाहीं; आपण पांडव वनवासी करावयास संमती दिली; एक ना दोन; या साऱ्यांचा दोष आपणाकडे आहे; आपण खरे या विनाशाला कारण आहोंत; आपण राजा असतां आपल्या संमतीनें हें सारें झालेलें आहे; हें कां त्याला सुचलें नसेल ? सुचलें असणारच ! पण तरीही त्यावेळीं प्रबल झाला तो त्याचा स्वार्थ. 'काय जिंकलें ? काय जिंकलें ?' म्हणून आनंदानें हैदोस घालणारी आपली मूर्ती स्मरून भीम आपली जी विटंबना करण्याची शक्यता त्याला दिसली तिनें तो हादरला. क्षणभर त्याचा शोकही मागें पडला आणि केवळ स्वार्थाच्या झटक्यांत त्यानें दुर्योधनाचा धिक्कार करून संजयापुढें उद्गार काढले, 'माझा पुत्र दुर्योधन परम नीच होय.'

मनुष्यस्वभावाचें जें वर्णन त्यानें स्वमुखानें केलें तें यावेळीं त्यानें आपल्या वर्तनानें सिद्ध केलें आहे. महाभारताचें सौंदर्य जसें त्यांतील आदर्शांच्या उदात्त वर्णनानीं घडलें तसेंच किंबहुना त्याहून अधिक स्खलनशील मानव्याच्या वास्तव दर्शनानें घडलेलें आहे, याचें हें एक रम्य उदाहरण होय.

## अप्रिये तिष्ठत्यंतम् ॥ २७

### याला खावूं कीं गिळूं?

कौरव-पांडव यांच्या घोर वैराचा अंत भीमाच्या हातून घडला. ज्यांचा वध झाल्याशिवाय हें वैर संपणार नव्हतें ते धृतराष्ट्राचे शंभरही पुत्र एकट्या भीमानें मारले. दुर्यो-

धनाची मांडी तोडून भीमानें त्याच्या डोक्यावर पाय दिला तेव्हां हें युद्ध संपलें. पांडव पक्षांतील सर्व योद्ध्यांत भीम अधिकात अधिक नीतीनें लढला ही गोष्ट निर्विवाद होय. तो सरळसोट मनुष्य असून त्याच्या प्रवृत्तीला कपट आणि राजकारण हें पटणारें नव्हतें.

ज्याप्रमाणें भीमानें निष्कपटपणें सर्व कौरवांचा वध करून हें युद्ध सपविलें; त्याचप्रमाणें त्याचा भीमसेनानें, सर्व कौरवांचा निष्कंपटवृत्तीनें छळ करून हें वैर आमंत्रिलें होतें. पंडू मृत्यु पावल्यावर अनाथ अपत्यें म्हणून जेव्हा हे पंडुकुमार हस्तिनापुरांत आले तेव्हां युधिष्ठिरानें जरी अनाथाची लाचार दीनता धारण केली असली तरी भीमाची वृत्ति मुळींच अनाथोचित नव्हती. त्याची वृत्ती दांडगेपणाची आणि दादागिरीची होती. कौरव आणि पांडव हीं सारीं मुलें जमून एकत्र खेळत तेव्हां भीमाचे पुढील खेळ चालत.

'वेगानें धावणें, दूरची वस्तू सर्वांत अगोदर पळवून नेणें, खाणें, पिणें, धूळ उडविणें या सर्व गोष्टींत भीम कौरवांचें मानमर्दन करीत असे. कौरव कुठें तरी आनंदानें खेळत असले कीं भीम त्यांना पकडून लपून बसत असे. त्यांच्या शेंडीस पकडून त्यांना धरून ठेवीत असे आणि आपल्या भावाकडून त्यांना चोप देववीत असे. त्याची एकमेकाची शेंडी धरून, त्यांचीं डोक्यावर डोका आपटीत असे. त्यांना जमिनीवर पालथें पाडून घांशीत असे आणि त्यांनीं आक्रोश केला तरी त्यांना सोडीत नसे. तेव्हां त्यांच्या डोक्यांचीं, खांद्यांची आणि गुडघ्यांचीं सालटीं जात. तो कौरवांच्या शेंड्या धरून त्यांना पाण्यांत बुचकळत असे आणि ते अर्धमेले झाल्यावरच त्यांना सोडीत असे. कौरव झाडावर चढले म्हणजे भीम तीं झाडें हालवून त्यांना खालीं पाडीत असे. त्याच्या या उद्योगांत कपट नव्हतें पण तरीही तो (अप्रिये तिष्ठत्यंतं) कौरवांना अत्यंत अप्रिय झाला होता.' याला खावूं कीं गिळूं असें त्यांना होत असे.

या भीमाच्या बाललीलांचें वर्णन मोठ्या रंगानें केलें जातें. वक्ते आणि श्रोते यांना वाटतें कीं आपण भीम आहोंत आणि चांडाळ कौरवांची खाशी जिरत आहे. आपण असा विचार करीत नाहीं कीं, या उद्योगांत चांडाळ असलाच तर तो भीम आहे आणि तो आपल्या या उद्योगानीं कौरवांना त्वेष आणवून चांडाळ बनविणार आहे. आपण कौरव असतों अथवा कौरवांचा बाप असतों तर आपणास भीमाच्या या लीलानीं काय वाटलें असतें याचा विचार नको काय ? कृष्णाच्या बाललीला आणि भीमाच्या बाललीला याची अवश्य तुलना करावी. कृष्णानें खोड्या काढल्या त्या जे आपणांस शिक्षा करण्यास समर्थ अशा मोठ्या लोकांच्या काढल्या व त्यांत








कुणासही कष्ट पडूं नये अशी काळजी घेऊन बुद्धीची चमक दाखविली. त्यामुळें त्या खोड्या प्रसंगीं विनोदाचा विषय होऊन खोड्यांस बळी पडलेले लोकही खेळकरपणें विनोदांत भाग घेण्यास मोकळे राहिले. कृष्णाचा खट्याळपणा असा आल्हादक असल्यानें त्याच्या मुरलीच्या नादाखालीं सारें गोकुळ एक झालें. भीमाच्या लीला ‘ बळी तो कान पिळी अशा दादागिरीच्या स्वरूपाच्या आहेत. दौर्बल्यगंडानें पछाडले असतील अशाच विकृत माणसांना या लीलांनीं आनंद वाटल. इतरांस त्या धिक्कारणीयच वाटावयास हव्या. पुढें जे महाघोर वैर उत्पन्न झालें त्याचें बीज यावेळींच पडलें. नशीब पाडवाचें म्हणून त्यांना द्रौपदी लाभली आणि तिच्या सौंदर्याचें आणि सौजन्याचें कृष्णावर पडलेलें आकर्षण अमाप स्नेहांत उन्नत होऊन तो त्यांच्या पक्षाला मिळाला. नाहींतर या वैरातून उत्पन्न झालेल्या घोर भवितव्यांत पांडव समूळ नाश पावते. भीमाचे हे उद्योग चालू असता त्याचें वय चवदा-पंधरा वर्षांचें होतें. तो कांहीं लहान नव्हता.

कौरवांनी भीमाची दहशत घेतली. त्याचा नाश हें प्राप्त कर्तव्य मानलें. त्यानीं भीमास वीष चारलें, पाण्यांत बुडविलें म्हणून कौरवांस नांवें ठेवलीं जातात. पण त्यांना हीं हीनकर्में करावयास कांहींच कारणें नव्हतीं काय ? भीमच त्याच्यावर आलेल्या या प्राणसंकटांच्या मुळाशीं नाहीं काय ? जे, भीम हीं कुकर्में करीत असतांना आनंदानें हंसले, ते सारे या हीन परिणतीचे वांटेकरी नाहींत काय ?

कुणी म्हणेल, म्हणून का वीष चारण्यांत यावें ? म्हणून का जींवें जाळण्यांत यावें ? प्रश्न बिनतोड वाटतो खरा. पण त्याचें उत्तर युधिष्ठिरानेंच आपल्या कृतीनें दिलें आहे. ती कृती म्हणजे पांडवांनी लाक्षागृहातून करून घेतलेली आपली सुटका. ही सुटका त्यानी जेव्हां करून घेतली तेव्हां त्यांनीं एक **निरपराध जिवंत** स्त्री, आणि तिचे पाच **निरपराध जिवंत** मुलगे यांना आपल्या घरीं आश्रयास बोलावून, ते अतिथी विश्वस्तपणें झोंपले असता, त्या घरास आपल्या हातानें आग लावून त्याना जिवंत जाळलें. येनकेन प्रकारानें पांडवाची स्तुती करावयास बसलेल्या सौतींची गोष्ट सोडा, पण आपण जेव्हां पांडवास कौरवानीं काय म्हणून जाळावें असा प्रश्न विचारतो तेव्हां अगोदर पांडवानां या निरपराध जिवास काय म्हणून जाळावें याचें उत्तर द्यावयास हवें.

भीमानें दुर्योधनाचें थोडें तरी वाकडें केलें होतें. युधिष्ठिर प्रत्यक्षाप्रत्यक्ष आपलें राज्य बळकावणार अशीं थोडीतरी लक्षणें दिसत होतीं. पण या सहा अनाथ लोकांनीं पांडवाचें काय वांकडें केलें होतें ? स्वतःची कातडी बचावण्यासाठीं पांडवांनीं यांना विश्वासांत गुंतवून त्यांचा गळा कापला आणि त्यांना जिवंत जाळलें तेव्हां त्यांनीं काय साधना केली ? त्यांनीं का अतिथि धर्म साधला ? की माणुसकी दाखविली ? कीं वेदांचा अर्थ लावून दाखविला ? सर्वांभूतीं एक आत्मा हें भगवताचें ब्रह्मज्ञान पटविलें ? कीं नरनारायण अवताराचे दिवे लावले ?

कौरवांच्या पातकाचा कंठशोषानें धिक्कार करणाऱ्या आपणाकडे याला काय उत्तर आहे ? कीं पांडव शेवटीं विजयी झाले म्हणून त्यांची पापेंही पुण्यरूप होतात ? कीं ते भागवत म्हणून त्यांना या पापाचा परवाना मिळतो ? कीं पांडवानी जाळले ते लोक दलित असल्यानें त्याच्या प्राणाला किंमत नव्हती ? ज्याला म्हणून न्यायाची चाड असेल त्याला या पापाचें समर्थन करताना लाज वाटावयास हवी. विश्वस्त निरपराधांना जाळणाऱ्या पांडवाना आपण शिरावर घेतों आणि सापराध दावेदाराना जाळणाऱ्या कौरवांना आपण लाथा मारतों. हा कसला न्याय ? न्याय करणेंच असेल तर आपण उभयाचा धिक्कार करावयास हवा.

पांडवाच्या विनाशाच्या दुर्योधनाचा योजनेंत त्याला कर्णानें सहकार दिला तो का उगाच ? त्याला काहीं कारणें होतीं का ? पहा. सर्व विद्यार्थ्यांची परीक्षा होणार आहे. यांत कर्ण पहिला नंबर येणार आहे. पण त्याला परीक्षेस बसूंच दिलें नाहीं. आईबापांचा पत्ता नाहीं म्हणून त्याला परीक्षेस नालायक ठरविलें जातें. हें ठरविणारांची दृष्टि आणि तें उचित मानणारी आपली दृष्टि सरळ आहे काय ? कर्णास राज्याभिषेक होतो तेव्हां भीम त्याला म्हणतो, ‘नीचा, कुत्रा ज्याप्रमाणें अमृत पिण्याला लायक नाहीं तसा तूं राज्यास लायक नाहींस.’ हें भाषण उच्च, उदात्त आहे काय ? कर्णानें पुढें यावज्जीव पांडवांना झोपेंत आपलीं स्वप्नें पाडलीं तीं उगाच नव्हे. भीमाच्या या अधम वर्तनांत त्याचें मूळ आहे.

आजवरच्या पांडवांच्या भाटांनी त्याचें कीर्तन केलें. आतां काळ बदलला आहे. आज पांडवाचे आदर्श पुन्हां तपासून घ्यावयास हवे. नाहींतर महाभारताला अर्थ उरणार नाहीं. दुर्दैवानें हें आपणास पटत नाहीं. आपण कर्ण, दुर्योधन इत्यादींची मनोभूमी समजून घेऊं शकत नाहीं. भीमाची अधम, अनुदार वृत्ति आपण शिरावर घेतली आहे. त्यामुळें म्हारडा, गावगुंड, रांडलेक असले शब्द आपल्या भाषणात आणि भाषेंत आहेत याची आपणाला शरम वाटत नाहीं. यामुळें आम्ही इतर कुणाचेंही नुकसान करीत नसून आपलेंच नुकसान करीत आहों. प्रत्येक वेळीं कृष्ण साह्यास येईल असें सांगतां येत नाहीं. आणि तो न आला तर आपण डिवचलेले, अपमानित केलेले हे कौरव आपणास पाणी पाजल्यावांचून रहाणार नाहींत. (क्रमशः)



## सांगावा

कोणीतरी तिला
जाऊनिया सांगा,
तुझा सांगावा सांगत
आल्या काजव्यांचा रांगा !

परी पराधीन
आतां झाला जीव,
डोळियाच्या आसवानें,
फुटे देहाला पालव

पाय खोल गेला
झालों शोभिवंत
कळा सोसतां सोसतां
झालों पुरा ‘ कळावंत ’

कुणी तिला सांगा,
सखा झाला मुका,
परी जपे गुलामींत
शिशिराच्या आणाभाका.

—अम्बादास दि. माडगूळकर



*प्रस्तुत छोटया छोटया कथा भारतीय फौजेंतील एका सेवानिवृत्त अधिकाऱ्यानें खास दीपावलीसाठीं लिहिल्या आहेत. लेखकानें त्या स्वत: अनुभवल्या आहेत. आज भारताच्या उत्तर सीमेवर चीन आक्रमक पाऊलें टाकीत आहे. पंचशील तुडवीत आहे. आपले जवान देशाचें रक्षण प्राणपणानें करीत आहेत. या पार्श्वभूमीवर प्रस्तुत कांहीं गमतीच्या चित्तथरारक सत्यकथा वाचताना वाचकाला क्षणभर श्वासहि रोधावा लागेल यांत शंका नाहीं—*

# युद्धस्य कथा

## मेमसाहेबांचा गालिचा

ब्रिटिश राजवटींतील गोष्ट. आमचे कर्नल साहेब बऱ्याच उशिरा म्हणजे चाळिशी उलटल्यानंतर नेहमींप्रमाणें ८ महिन्यांची सुट्टी घेऊन विलायतेला गेले. तेथें प्रेमांत सांपडले आणि येतांना सपत्निक परत आले. पत्नी त्यांच्यापेक्षां वयानें बरीच लहान होती व हौशीही होती. ती पहिल्या प्रथमच हिंदुस्थानांत आली होती. सहाजीकच विलायतेंत दुर्मिळ असणाऱ्या वस्तु खरेदी करण्याचा तिनें सपाटा चालविला. पहिल्या प्रथम कर्नल साहेब बायकोस स्वतःच बाजारांत घेऊन जावयाचे. पण पुढें पुढें त्यांना कंटाळा येऊं लागला.

अखेर एक दिवस ते आपल्या बायकोला म्हणाले, हे बघ लाडके, मला नेहमीं तुझ्याबरोबर येणें शक्य नाहीं. तेव्हां तुला पुष्कळ वेळां एकटें जाण्याचा प्रसंग येईल. ह्या छावणीमध्यें मोठी मोठी दुकानें नाहींत म्हणून बरें, नाहींतर माझें दिवाळेंच निघालें असतें. तूं खरेदी कर पण मी काय सांगतो हें नीट ध्यानांत ठेव. हे हिंदुस्थानी लोक मोठे लुच्चे व लबाड असतात. त्यांतल्या त्यांत दुकानदार आणि पक्के बदमाश म्हणजे दारावर येणारे फेरीवाले. त्यांना घासाघीस करावयांची फार हौस असते आणि ते मुद्दाम किंमती फुगवून सांगतात.

तेव्हां तूं सर्वसाधारणपणें एक गोष्ट लक्षात ठेव. फेरीवाल्यानें सांगितलेल्या किंमतीच्या आपण नेहमीं २५ टक्के किंमत सांगावी म्हणजे बहुतेक अर्ध्या किंमतीला सौदा पटतो. सौ. कर्नल मेमसाहेबांनीं हें नीट लक्ष्यांत ठेवलें आणि स्वतःशीं म्हणाल्या, 'आतां या म्हणावें फेरीवाल्यांनों. माझा इंगाच दाखविते. मला फसवायला पहातात काय लेकाचे !'

सुमारें १० दिवसांनीं सकाळीं, कर्नल साहेब ऑफिसमध्यें गेले आहेत अशी खात्री करून घेऊन, एक फेरीवाला बंगल्यांत पोहोंचला. मेमसाहेब बाहेरच व्हराडयांत सिगरेट ओढीत व सुखस्वप्नांत बसलेल्या होत्या. फेरीवाल्यानें जमिनीपर्यंत लवून सलाम केला आणि आपल्या मोडक्या इंग्रजींत म्हणाला, 'मेमसाहेब फार उत्तम गालिचे आहेत. हुजूर आपली कीर्ति आणि पारख ऐकून मी फार लांबून आज मुद्दाम तुमच्याकडे आलों आहे. गालीचा घेतला नाहीं तरी चालेल, पण फक्त तुमच्या तोंडून माझ्या मालाची प्रशंसा तरी ऐकावयाची इच्छा आहे.'

तदनंतर मेमसाहेबांच्या होकाराची वाट न पहातां त्यानें एक एक गालीचा उघडून दाखविण्यास सुरुवात केली. मेमसाहेबांचे डोळे इतके सुंदर गालीचे पाहून तर दिपूनच गेले. त्याना एक गालीचा विकत घ्यावयाचा होता पण किंमतीचा कांहींच अंदाज नसल्यामुळें त्या मनांतल्या मनात घाबरतच होत्या. त्याचबरोबर नवऱ्यानें शिकविलेला गुरुमंत्र प्रत्यक्ष अंमलात आणून आपल्या व्यवहारचातुर्याची प्रचीति घेण्याचीही त्यांना धुरधुरी आली होती. अखेर त्यांच्यानें राहवेना. त्या म्हणाल्या, 'फेरीवाले, माल चांगला आहे आणि मलाही एक गालीचा घ्यावयाचा आहे. पण किंमत आधी सांग. आणि हें पहा माझ्याशीं धोकेबाजी चालावयाची नाहीं. तुम्हा लोकांची फसवाफसवी मला पूर्ण अवगत आहे. तेव्हां नीट काय तें समजून एकच किंमत सांग.'

धूर्त फेरिवाल्यानें क्षणांत ओळखलें कीं सावज जाळ्यांत आलें आहे. तो अगदी साळसूदपणें म्हणाला, 'हुजूर ! फसवाफसवी आणि आम्हीं केली तरी तुमच्यासारख्या अनुभवी आणि चाणाक्ष मेमसाहेबाजवळ कशी चालणार.' मेमसाहेब आता मात्र पुरत्या खुलल्या. थोडा विचार करून आणि एका कागदावर हिशोबाचे कांहीं तरी गिचमीड आकडे मोडून तो म्हणाला, 'हुजूर, अगदीं एकच किंमत. आणि तीसुद्धां तुमच्यासारख्या पारखी मेमसाहेबांकरिता म्हणून फक्त रु. ३०००' इतके म्हणून त्यानें तो गालिचा बाहेर काढून ठेवला व बाकीच्या सामानाची बांधाबांध करण्यास सुरवात केली.

मेमसाहेब किंमत ऐकून चाटच पडल्या. तीन हजार रुपये म्हणजे नवऱ्याच्या एका महिन्याच्या पगारापेक्षांहि जास्त. पण लगेच त्याना नवऱ्यानें सांगितलेला गुरुमंत्र आठवला. तसेंच विलायतेमध्यें असेंहि ऐकलेलें आठवलें कीं उत्तम गालीच्या १०००–१५०० रुपयाखालीं मिळतच नाहीं. तेव्हां त्यानीं मिळालाच तर हजार रुपयाला सौदा करावयाचें ठरविलें. कारण गालीच्या अगदीं त्याना हवा होता तसाच होता.

एका तासाच्या घासाघिशीनंतर फेरीवाल्यानें दोनतीन वेळां बंगल्याबाहेर जाण्याचें सोंग





करून एक हजार रुपयांना तो गालीचा मेम-साहेबांना विकला.

मेमसाहेबांना असें झालें होतें कीं, केव्हां पतिराज घरीं येतील व मी त्यांना सांगेन, कारण त्यावेळेस टेलिफोन नव्हते. कर्नल साहेब मोटारींतून उतरतांच पत्नीनें गळ्यांत मिठी घालून व एक गोड चुंबन देऊन आपल्या सौद्याची बहादुरी वर्णन केली.

कर्नल साहेबांनीं त्या गालिच्याकडे फक्त एक नजर फेकली आणि ते कपाळाला हात लावून खाली बसले. कांहीं एक न बोलतां, ते तसेच बायकोला मोटारींत घालून बाजारांतील एका ओळखीच्या दुकानांत गेले व हुबेहूब तसल्याच गालिच्याच्या किंमतीची चौकशी केली. दुकानदार म्हणाला, 'शंभर रुपये!' मेमसाहेबांच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले.

## सार्जंट मेजर हॅन्ड

नुकतेच इंग्लंडमधून कमिशन मिळून मी परत आलो होतो. सन १९२९ सालची हिंदुस्थानांतीलच गोष्ट. त्यावेळेस ब्रिटिश राज्य जोरांत होते आणि इंग्रजी फौजा हिंदुस्थानांतील निरनिराळ्या छावण्यांत असत. त्यावेळेस किंग्स कमिशन मिळालेले हिंदुस्थानी ऑफिसर, सबंध हिंदुस्थानांत फार फार ४०–५० असतील. इंग्रजी शिपायांना हिंदुस्थानमध्यें एखाद्या हिंदुस्थानी (काळ्या) ऑफिसरला सलाम करावयाचा म्हणजे अपमान वाटत असे. आणि शक्य तर ते असा सॅल्यूट करणें चुकवीत असत. अगदीं नाइलाजच झाला तर कायद्याप्रमाणें सॅल्यूट करावा लागत असे ही गोष्ट वेगळी.

त्या दिवसामध्यें सँढर्स्ट कॉलेजमधून कमिशन मिळवून बाहेर पडणाऱ्या हिंदी फौजेच्या सर्व ऑफिसर्सना, इंग्रजी आणि हिंदी दोन्ही, एक वर्ष एखाद्या ब्रिटिश पलटणीबरोबर उमेदवारी करावी लागावयाची, अर्थात ऑफिसर म्हणूनच. खुद्द त्या पलटणीचे ब्रिटिश शिपाई मात्र, एकदां ओळख झाल्यावर, अगदीं आनंदानें व आपणहून हिंदी ऑफिसरला सलामी देण्यास चुकावयाचे नाहींत. विशेषतः ब्रिटिश सेनेचे आधारस्तंभच असे असलेले सार्जंट मेजर हा कायदा स्वतः आपलेपणानें पाळावयाचेच पण दुसऱ्या पलटणीच्या इंग्रज शिपायांकडून सुद्धां पाळून घेण्याची दक्षता घ्यावयाचे.

आमच्या कंपनीचा सार्जंट मेजर होता. त्याचें नांव हॅंड...एके दिवशीं सकाळीं मी–माझ्या ब्रिटिश पलटणींतील एकटाच हिंदुस्थानी ऑफिसर–माझ्या कंपनींत एकटाच ऑफिसर शिल्लक राहिलों. कारण इतर सर्व ब्रिटिश ऑफिसर दुसऱ्या कामांकरितां नियुक्त झाले होते. औटघटकेचा अधिकार भोगीत, परेड संपल्यानंतर मी शिरस्त्याप्रमाणें बराकींची इन्स्पेक्शन करण्यास निघालों. सार्जंट मेजर अर्थातच माझ्याबरोबर होता.

आमच्या पायदळ पलटणीच्या शेजारीच एक ब्रिटिश तोफखाना होता. त्यांचा व आमचा रस्ता सामाईक होता. ब्रिटिश गोलंदाज विशेष कुरेवाज, अखडू आणि साधारणतः शिस्तीस वाऱ्यावर उधळणारे असा त्यांचा लौकिक असे. मी इन्स्पेक्शनला जात असतांना समोरूनच मला एक ब्रिटिश गोलंदाज येतांना दिसला. रस्त्याच्या दोन्ही बाजूस बराकी असल्यामुळें त्याला मला चुकविता येणें अशक्य होतें व त्याला माझ्या समोरूनच जावें लागणार होतें. तो मला सॅल्यूट न करितां जाणार अशी माझी खात्रीच होती. पण आमचा सार्जंट मेजर हॅंड काय करील याचेंच मला कुतुहल वाटत होतें. असो. तीही वेळ जवळच येत चालली होती.

त्या ब्रिटिश गोलंदाजानें लांबून मला पाहिलें होतेंच तसेंच इतर जाणारे येणारे आमच्या पायदळ पलटणीचे शिपाई मला येता–जातांना सॅल्यूट करीत होते हेही तो पहात होता. पण कांहीं झालें तरी मी होतो एक हिंदुस्थानी म्हणजे काळा (तसा मी रूपानें गोरा होतो तरी पण!) एक स्टारवाला फडतूस अधिकारी आणि तो ब्रिटिश तोफखान्याचा गोलंदाज.

तो माझ्या समोरून येऊन बेपर्वाईनें सॅल्यूट न करतां पुढें निघून गेला. मी कांहींच बोललों नाहीं पण सार्जंट मेजरचें मात्र पित्त खवळलें. एक दोन पैशाचा ब्रिटिश गोलंदाज आणि त्याची सार्जंट मेजरच्या कंपनी कमांडरला (आठ घटकेचा का होईना) सॅल्यूट न करतां जाण्याची धडाडी आणि हिंमत? तो गोलंदाज माझे अंगावरून ४–५ पावलेंच पुढें गेला असेल, इतक्यांत सार्जंट मेजर कडाडला 'ए गोलंदाज, डोळे फुटले काय तुझे? आधीं इकडे ये पाहूं. नंतर ब्रिटिश सार्जंट मेजरच्या शब्दकोशांतील ठेवणीतल्या शिव्यांचा २–३ मिनिटें भडिमार. तेथपर्यंत मी पांच दहा पावलें पुढें निघून गेलो होतो. सार्जंट मेजरनें तेथूनच मला विनविलें, 'लेफ्टनंट साहेब जरा थोडा वेळ तेथेंच उभे रहा. हा उर्मट गोलंदाज आत्ता सरळ होईल.' मी त्याप्रमाणें उभा राहिलो.

नंतरचा प्रसंग मी जन्मांत विसरणार नाहीं. त्या गोलंदाजाला सार्जंट मेजरनें शिक्षा म्हणून माझ्या पलिकडे २०–२५ यार्ड पळत जाण्यास लावलें. नंतर त्यानें मार्च करीत माझ्या अंगावरून सॅल्यूट करीत पुढें निघून जावयाचें व माझ्यापासून ४–५ पावलें गेल्यावर पुन्हां पळत परत जावयाचें व वरील कार्यक्रम पुन्हां पार पाडावयाचा असें एक डझन वेळां झालें. त्याला चांगलीच अद्दल घडली आणि मलाहि अप्रत्यक्षरूपानें शिक्षाच झाली. कारण दरवेळेला मला सुद्धां त्याचा सॅल्यूट शिस्तीत परत करावा लागत होता.





अनुक्रमणिका

ब्रिटिश गोलंदाजाची अशी न भूतो न भविष्यती 'चंपी' झाल्यावर सार्जंट मेजरनें पुन्हां त्याला जामलें व बजाविलें, 'जर माझ्या ह्या ऑफिसरला तूं पुन्हां उर्मटपणें मुद्दाम सॅल्यूट केला नाहींस असें मला आढळून आलें तर माझ्याशीं गाठ आहे.'

सार्जंट मेजर माझ्याकडे वळून म्हणाला, 'सर, हे तुम्ही मनावर घेऊं नका. असेच मूर्ख आणि माथेफिरू ब्रिटिश सैनिक, हिंदुस्थानांत ब्रिटिश सेनेचें नांव बदनाम करतात.'

## सार्जंट मेजर बेटस्

सन १९४३ सालची गोष्ट. माझी नेमणूक त्यावेळीं हिंदुस्थानांतच एका इटालिअन युद्धबंद्यांचे कँपवर झाली होती. युद्धांत पकडलेले सर्व कैदी इटालिअन होते म्हणून त्यांची शिस्त वगैरे सांभाळण्याकरितां आणि कँपच्या अंतर्गत व्यवस्थेकरितां ब्रिटिश सैनिकच होते. नेहमीप्रमाणें ऑफिसर्समध्येंही मी एकटाच हिंदुस्थानी ऑफिसर होतो. पण वासरांत लंगडी गाय शहाणी म्हणतातना तसेंच झालें होतें.

एक–दोन ऑफिसर सोडून इतर ऑफिसर ब्रिटन आणि हिंदुस्थानमधील इंग्रज रहिवाशांच्या उकिरड्यांवरून वेचले गेले होते. त्यांना ना कुळ ना गोत. शिक्षण जवळ जवळ नाहींच. केवळ कातडीचा रंग आणि नशीब यामुळेंच ते ऑफिसर झाले होते. साहजिकच तुलनात्मक दृष्टीनें माझा नंबर फारच वर होता आणि ह्यामुळेंच बहुधा, इंग्रज सैनिकांना त्यांच्या स्वतःचा ब्रिटिश अधिकाऱ्यापेक्षां माझ्याबद्दल जास्ती आदर होता. आणि तसेंच प्रेमही होतें. ह्या कँपमध्यें माझा सार्जंट मेजर होता बेटस् नांवाचा एक इंग्रज. २०–२२ वर्षें इंग्रजी फौजेंत नोकरी करून व दुसऱ्या महायुध्दाच्या सुरवातीनंतर बहुतेक सर्व लढायांत त्याच्या पलटणीबरोबर तावून सुलाखून निघालेला अनुभवी वॉरंट ऑफिसर होता. त्याचें वैशिष्ट्य म्हणजे तो नेहमीं हंसतमुख आणि अतिशय विनोदी होता. त्याच्या बरोबर तास–दोन तास बसलें म्हणजे हंसतां हंसतां पोट दुखावयाची वेळ यावायची. तो तितकाच शिस्तीमध्येंही कडक होता.

एक दिवस माझी ऑर्डली ऑफिसरची ड्यूटी लागली होती आणि सार्जंट मेजर बेटस् त्या दिवशीं ऑर्डली वॉरंट ऑफिसर होता. इतर बऱ्याच कामांपैकीं आम्हां दोघांचें एक काम म्हणजे संध्याकाळीं सात वाजतां एक स्पेशल परेड व रात्रीं १० वाजतां पुन्हां स्पेशल परेड असे, त्याला हजर रहाण्याचें असे. त्या दिवशीं दुपारीं सार्जंट मेसमध्यें सार्जंट मेजरचा पाहुणा म्हणून मी गेलों होता. बेटस् नेहमीपेक्षां जरा जास्तच पेय घेतांना मला आढळला. पण मला त्यावेळेस कांहींच कर्तव्य नव्हतें म्हणून मी बोललों नाहीं. त्यानंतर लौकरच मी माझ्या तंबूत गेलों.

संध्याकाळीं ६॥। ला मी परेडवर हजर झालों. नेहमी सार्जंट मेजर बेटस् माझ्या आधीं ५ मिनिटें हजर असावयाचा पण आज हजर नव्हता. ५ वाजले बेटस्चा पत्ता नाहीं. तेव्हां मी तेथें हजर असलेल्या दुसऱ्या सार्जंटला म्हणालो, 'अरे मी विसरलोंच कीं, सार्जंट मेजर माझी परवानगी घेऊन दुसरीकडे गेला आहे. आतां तूंच त्याचें काम कर.' परेड वगैरे संपली व आम्ही परत गेलो. परत जात असातांना एक चुगालखोर इंग्रज सार्जंट मला म्हणाला, 'सर, तुम्हाला माहीत नाहीं असें दिसतें. सार्जंट मेजर बेटस् चिक्कार पिऊन आपल्या तंबूत निजला आहे. तुम्ही उगीचच त्याची बाजू घेतली.' मी कांहींच उत्तर दिलें नाहीं.

रात्रीं १० च्या परेडला बेटस् हजर होता. त्याचे डोळे तारवटलेले होते आणि तोंडाची घाण त्यावेळेस सुद्धां गेली नव्हती. सर्व कार्यक्रम आटोपल्यानंतर बेटस् माझ्यासमोर उभा राहिला व एक उत्तमपैकीं सॅल्यूट ठोकून म्हणाला, 'सर, माझा एक रिपोर्ट आहे.' तो स्वतः स्वतःच्या विरुद्ध रिपोर्ट करणार होता तें मी ओळखलें. परेडवर मी त्याचा रिपोर्ट ऐकला असता तर त्याची संध्याकाळची गैरहजेरी-जो फौजी कायद्यामध्यें एक मोठा गुन्हा आहे–मला माझ्या अधिकृत रिपोर्टमध्यें दुसऱ्या दिवशीं सकाळीं नमूद करणें भाग पडलें असतें. सबब मी त्याला उत्तर दिलें, 'सार्जंट मेजर बेटस् आतां रात्रीचे १० वाजून गेले आहेत आणि ही वेळ अधिकृत रीत्या रिपोर्ट ऐकावयाची नाहीं. तुझा रिपोर्ट उद्यां सकाळीं ऐकला जाईल. तो आत्ताच ऐकला पाहिजे इतक्या महत्त्वाचा असावा असें मला वाटत नाहीं. तूं जाऊं शकतोस.' इतकें बोलून मी माझ्या तंबूकडे जाण्यास निघालो. जातां जातां मी सहज म्हणालो, 'बेटस् तुझें काम आटोपल्यावर जरा माझ्या तंबूवर येऊन जा बरें कां ?'

सुमारें १५ मिनिटांनीं सार्जंट मेजर बेटस् तंबूबाहेर उभा राहिला. मी त्याला आंत बोलाविलें आणि खुर्चीवर बसण्यास सांगितलें. तो संकोच करूं लागला. मी त्याला समजाविलें कीं हा माझा तंबू आहे. परेडची जागा नव्हे आणि त्याचा हात धरून त्याला खालीं बसविलें व नंतर जबरदस्तीनें त्याला एक ग्लास पेय पिण्यास लावलें तेव्हां तो म्हणाला, 'सर एवढें तुम्ही माझ्याकरितां कां करतां ? मी माझ्या आजच्या वागणुकीनें माझ्या दर्जाला काळीमा लावला आहे.' मी उत्तर दिलें 'बेटस, तू फौजेमध्यें भरती आणि मला कमिशन जवळ जवळ एकाच वेळचें. आपण जर एकमेकांना मदत कराची नाहीं तर मग काय आजची पोरें करणार. आपापसांत निभावून घेतलेंच पाहिजे.' सार्जंट मेजर बेटस्चा हट्ट एकच. लष्करी कायद्याप्रमाणें त्याच्या हातून गुन्हा झालेला आहे आणि त्याबद्दल शिक्षा झालीच पाहिजे.' बराच वेळ चर्चा करून मी त्याला पटवून दिलें कीं वरिष्ठ अधिकाऱ्याच्या नजरेस गुन्हा आणला गेला म्हणजे त्याचें समाधान झाले पाहिजे. गुन्हा कोणत्या तऱ्हेनें नजरेस आणावयाचा हा प्रश्न, आणि शिक्षा द्यावयाची किंवा नाहीं हें सुद्धां माझ्या आणि कर्नल साहेबांच्या मर्जीवरच अवलंबून राहील. आणि अखेरीस तो ह्या तडजोडीस कबूल होऊन परत गेला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं कर्नल साहेबांजवळ मी बोलतां बोलतां झाल्या गोष्टीचा उल्लेख केला आणि बेटस्करितां माफी मिळवली, आणि अखेरपर्यंत सार्जंट मेजर बेटस् माझा एकनिष्ठ सेवक आणि मित्र राहिला.

● ● ●

*( या सर्व सत्यकथा असल्यानें अर्थातच मूळचीं नांवें बदलून काल्पनिक नांवें दिलेलीं आहेत. स्थळाचा निर्देश मात्र सत्य आहे. )*

**देवळांत देव नाहीं**
**कशी करूं मी भक्ति**
**कर्म उभें, कर्ता नाहीं**
**सांगा तुम्ही विभक्ति**

—जयवन्त गुजर



अतिथीसत्कारासाठी भारताची ख्याति पूर्वापार आहे. अतिथीला विन्मुख न दवडणें हा धर्माचा भाग मानला जात असे. आतिथ्यशीलतेच्या कल्पना आज बदलल्या असल्या तरी प्रथा तीच आहे. पाहुणे-मंडळी घरीं येतात तेव्हां विविध प्रकारच्या गोड पेयांनीं त्यांचें स्वागत केलें जातें. या पेयांत मुख्यत्वें साखरेचा अंतर्भाव असतो. उत्साहवर्धक, थंड अथवा चहाकॉफीसारखी साखरेनें गोड होणारीं गरम पेयें देऊन आदरातिथ्य करणें हा गृहस्थधर्माचा शिष्टाचार आजहि मानला जातो.

# आतिथ्याची परंपरा

## अधिक साखर खा




साखर—प्रत्येक गोड, स्वादिष्ट वस्तूचें आकर्षण आहे. पदार्थांमधील गोडीचा प्रारंभ साखरेपासूनच होतो. ती उत्साहाची प्रेरकशक्ति आहे. अधिक साखर खा, जोम व स्फूर्ति मिळवा, आरोग्यसंपन्न व्हा. जीवनसौख्यांत भर घालणारी साखर आबालवृद्धांना सारखीच उपयुक्त व आनंददायक चीज आहे.

वालचंदनगर येथील साखरेचा कारखाना स्फटिका-सारखी शुभ्र, चमकदार व शुद्ध साखरेसाठीं भारतांत विख्यात आहे. केवळ साखरेसाठींच लावण्यांत येणाऱ्या गोड, रसाळ उंसापासून वालचंदनगर-साखर तयार होते.




वालचंदनगर इंडस्ट्रीज लिमिटेड, वालचंदनगर, पुणें जिल्हा

WN/EMS-3/62 (M) TOM & BAY



अनुक्रमणिका








*'दशावतारी' हें काय प्रकरण असतें हें तुम्हीं कधीं पाहिलें आहे काय ? नसल्यास जयवंत दळवी यांच्या चालू विनोदमालेंतील हा लेख वाचा. हंसतां हंसतां पूर्वीचें तें वैभव दृष्टिगोचर होईल आणि कोंकणांत जाऊन आल्याचें समाधानहि लाभेल. ...!*



गांवांत त्यावेळीं सिनेमाचें थेटर नव्हतें. गाजलेल्या नाटक मंडळ्यांची मजल आमच्या गांवापर्यंत पोचली नव्हती. त्यामुळें खळनाथाचें देऊळ हेंच एकमेव असें करमणुकीचें स्थान होतें. वेळोवेळीं होणारे उत्सव, जत्रा आणि त्यावेळीं होणारीं दशावतारी मंडळींचीं नाटकें हींच फक्त मन रिझवण्याचीं साधनें होतीं. अधून मधून आसपासच्या गांवांतली दशावतारी मंडळी येत असत आणि आपापलीं नाटकें सादर करीत असत. तरीहि खुद्द आमच्याच गांवांतली खळनाथ प्रासादिक दशावतारी मंडळी सर्वांत अधिक लोकप्रिय होती. जिवा शिंगी हा या मंडळीचा सूत्रधार. देवळांतील पालखी उठतांना शिंग फुंकण्याचें काम जिवाच्या घराण्याकडे होतें. त्यामुळें त्याच्या घराण्याला शिंगी हें नांव पडलें होतें. जिवाचा बाप भिवा, तो मरून किती तरी वर्षें झालीं होतीं. तरी तो जे शिंग फुंकायचा तें जुन्या गांवकऱ्यांच्या पुरेपूर आठवणींत होतें. डावा पाय पुढें आणि उजवा मागें टाकून तो अर्धवर्तुळाकृति शिंग फुंकूं लागला कीं त्याच्या गळ्याच्या शिरा म्हणे अंगठ्याएवढ्या टचटचीत फुगत असत. त्यानें शिंग फुंकलें कीं भली मोठी फौज रणांगणावर निघाल्याचा भास व्हायचा.

त्याचाच झील जिवा. शिंग फुंकण्याचें कसब त्याला जमलें नाहीं. पण उत्कृष्ट दशावतारी नट म्हणून त्यानें थेट गोव्यापर्यंत कीर्ति संपादन केली होती. खळनाथ दशावतारी मंडळीचें नांव निघालें कीं सर्वांच्या डोळ्यापुढें जिवाची मूर्ति उभी रहायची. आसपासच्या गांवांत किंवा गोव्यांत जाऊन येणारे गांवकरी परत येतांच अभिमानें फुगायचे. कारण कितीतरी अनोळखी लोक तेथें आपुलकीनें जिवाची चौकशी करायचे. जिवाची मंडळी परत कधीं येणार असें उत्सुकतेनें विचारायचे.

देवळाच्या पाटीमागें जें शेवंता भावणीचें घर होतें त्यांत जिवा आपला अजगरासारखा लोळत पडलेला असायचा. मला आंटवतें, कधीं संध्याकाळीं देवदर्शनाला गेलों कीं भसाड्या आवाजांतल्या ताना हमखास ऐकूं यायच्या. कधीं कधीं मृदंगाचे बोल कानी यायचे. बहारदार मृदंग वाजविणें हा त्याच्या हातचा मळ होता. गळ्यांत मृदंग अडकवला कीं तो स्वतःला हरवून जायचा. पानानें भरलेलें तोंड विचकून हंसत, टकमका डोळे नाचवीत तो मृदंग वाजवूं लागला कीं हां हां म्हणतां त्या तालांतच तो बुडून जायचा. पण त्यानें कितीहिं ताना भिरकावल्या तरी त्यांत मात्र संगीत औषधापुरतेंहि नसे. शेवंता भावणीच्या ओट्यावर गोणपाटाच्या तक्क्याला डोकें टेकून तो

उताणा पडला कीं ताना दिल्याच पाहिजेत असें एक आपलें त्यानें ठरवून टाकलें होतें. म्हाताऱ्या कुत्र्यावर काठी मारली कीं तो जसा हेल काढीत केकाटतो तसा जिवा आलाप मारायचा. त्यांत मधुर स्वरांचा मागमूसहि नसायचा. पण नाटक्याचा आणि संगीताचा संबंध असलाच पाहिजे असा एक त्याचा समज होता.

पुरेपूर सहा फूट उंची. हाडापेरानें राक्षसासारखा दांडगा. करपलेल्या मातीच्या मडक्यासारखें तोंड. डोळ्याभोंवतीं काळीभोर वर्तुळें आणि सुटलेल्या कातडीच्या थैल्या. डोळ्यांच्या कडा सदासर्वदा लाल. तोंडाची जिवणी बेसुमार पसरलेली. खालचा जाडजुड ओठ विड्यानें रंगलेला आणि हनुवटीवर टेकलेला. दाढेंत सदासर्वदा पानाचा चोथा. जागरणानें सदान्‌कदा काळवंडलेला चेहरा. मानेवर लोळणाऱ्या केसांच्या झिंज्या. आणि कानावर बंडखोर केसांचीं झुलपें असा मुलखावेगळा नोकझोक होता जिवाचा.

आणि याहिपेक्षां त्याचा पोषाख तऱ्हेवाईक असायचा. तांबड्या मातीनें रंगलेलें पायघोळ धोतर गळ्याकडे घामेजलेला आखूड गळपट्टीचा सदरा. त्यावर तिप्पट चौपट अंगाचा धुरकटलेला कोट. शर्टाखालीं चांगला वीतभर लोंबणारा कोटाचा एक खिसा म्हणजे लांबरुंद पिशवीच. गळ्याभोंवतीं रंगीत रेशमी रुमाल. दोन भुवयांमध्यें लाल गंधाची टिकली. डोकीवर लूत लागलेली केसाळ काळी टोपी आणि हाताच्या सर्व बोटांत तांब्या–पितळेच्या कळकटून गेलेल्या आंगठ्या.

जिवा शिंग्याचें घराणेंच दशावतारी. आपण या घराण्यांतला दहावा अवतार असें जिवा विनोदानें म्हणायचा. बदलत्या काळाप्रमाणें दशावतारी नाटकाची जी वाताहात झाली ती पहाता आमच्या गांवांत तरी जिवा हा दहावा आणि अखेरचा अवतार असेंच म्हटलें पाहिजे. रवळनाथाच्या आश्रयाखालीं वाढलेली आणि जिवाच्या मागून मोडकळीस आलेली रवळनाथ प्रासादिक दशावतारी मंडळी ही पिढ्यान् पिढ्या जिवाच्या घराण्यांत होती. जिवाचा बाप भिवा म्हणा किंवा राघो म्हणा, एकेकाची ह्यात या नाटकांपायीं रात्र रात्र जागून गेलेली. हीं सारीं वेडीं माणसें आपापल्या ह्यातींत एकूण किती तास झोपलीं असतील हें त्यांचें त्यांनाच ठाऊक! जिवा हा आपल्या आज्यासारखा दिसायचा असें गांवकरी म्हणत. राघो म्हणजे मूर्तिमंत दैत्य. दशावतारी नाटकांत शंखासुराचें काम म्हणे बेमालूम वठवायचा. आरोळी असा दणकून ठोकायचा कीं लहान कच्चींबच्चींच काय पण जाणतीं माणसें सुद्धां अंग काढून दचकायचींत. आतां शखासूर येणार हें कळलें कीं नाटक पहायला आलेल्या बायका पोरें



‘ माझां घर माझी बाईल. घरांत हक्क माझो नाय तर आणखी कोणाचो ? ’ असा उलटा सवाल करून तो धर्मशाळेकडे जावूं लागला.

घाबरूं नयेत म्हणून त्यांना कुशींत घेऊन बसायच्या. लढाई करण्यांत सुद्धां म्हणें तो तरबेज होता. त्याच्या त्या कामावर खूष होऊनच माझ्या पणजोबानीं आपल्या हातानें सर्वांसमक्ष राघोच्या खांद्यावर जरभरी उपरणें ठेवलें होतें. नाटकाच्या दिवशीं गांवांतल्या मानकऱ्यांना आमंत्रण देण्यासाठीं राघो बाहेर पडला कीं तें उपरणें हमखास त्याच्या खांद्यावर असायचें. त्याच्या ह्यातींत त्याच्या घरावर दोन तीनदां जप्ती आली. पण दशावतारी पेटारा आणि हें उपरणें त्यानें कधीं जप्त होऊं दिलें नाहीं. त्याच्या पश्चात् भिवानें आणि नंतर जिवानें तें उपरणें मोठ्या अभिमानानें मिरविलें. आपल्या घराण्याची नाटकी परंपरा सांगतांना जिवा या उपरण्याचा उल्लेख मोठ्या अभिमानानें करायचा. नाटकाचें आमंत्रण देतांना किंवा सणासुदीला हें उपरणें खांद्यावर घेतलें कीं जिवा उपरण्याच्या इतिहासांत हमखास शिरायचा आणि माझ्या पणजोबांसारखा नाटयरसिक आतां मिळणें कठीण असें म्हणून मनांत खुपणारी हळहळ सर्वांसमक्ष व्यक्त करायचा.

जिवानें आपल्या पूर्वजांप्रमाणेंच आपली ह्यात नाटकांत ओतली. पण नाटकांतून त्यानें पैसाअडका कांहीं सुद्धा मिळवला नाहीं. जो मिळवला तो असा तसा चालवला. पैसा नाहीं म्हणून कधीं खिन्न झाला नाहीं. हळहळला नाहीं. फक्त आपल्या नाटकाला लोकांनीं गर्दी केली नाहीं तरच तो हळहळायचा. एऱ्हवीं कधींच नाहीं.

डोंगरपायथ्याशीं त्याचें मोडकळीस आलेलें जुनें घर होतें. बाहेरच्या ओट्यावर खुंटीला टांगून ठेवलेलें पितळेचें चकचकीत शिंग दर्शनी दिसायचें. तीच जिवाच्या घराची खूण. तेथें त्याची लग्नाची बायको बाया रहायची. तिच्या एका डोळ्यांत फूल पडलें होतें. म्हणून कुरडी बाया या नांवानेंच ती ओळखली जाई. नाटकापायीं म्हणा अथवा आपल्या इतर छंदापायीं म्हणा जिवानें तिच्याकडे आपली बायको म्हणून कधींच लक्ष दिलें नाहीं. नाटकांतलें जिवाचें काम कधींच जन्मात पाहिलें नाहीं अशी या गांवांत एकच व्यक्ति होती आणि ती म्हणजे कुरडी बाया. तिनें कधींच जिवाचें नाटक पाहिलें नाहीं. ‘ जन्माचां झालां नाटक ! ’ असे धगधगीत उद्गार काढून ती आपल्या कामांत व्यग्र व्हायची. घराभोंवतालच्या परसांत बारीक सारीक लागवड करायची. भाजीपाला, पानवेली, फुलझाडें लावून भाज्या, पानें, फुलें यांची विक्री करून कशीबशी गुजराण करायची. बाळंतिणीला तेल लावून वर्षाकाठीं दोन तीन वापरलेलीं लुगडीं मिळवायची. स्वतःशींच फुत्कार टाकीत वांकड्या मानेनें एका डोळ्यानें धुंदीत आपल्या कामांत दंग असायची. पण

तरीही जिवाच्या नांवानें टच्चू पैशाएवढें कुंकूं लावायची.

पण जिवा मात्र आपल्या घरीं कधींच रहात नसे. पंचेचाळिशीकडला जिवा पन्नाशीं उलट-लेल्या शेवंता भावणीच्या पडवींत पडलेला असे. कधीं तांदूळ, नारळ, मासळी आणून तिला द्यायचा आणि तिथेंच चार घांस पोटात ढकला-यचा.पेटारा घेऊन गांवोगांवी हिंडायला निघाला कीं आपल्या घरीं यायचा आणि माजघरांत तांब्यावर ठेवलेल्या नारळाला हात लावून साष्टांग नमस्कार घालायचा. गांवोगांव हिंडून परत आला म्हणजे मग पुनः एकदा असेंच करायचा. यापलिकडे त्याचा आपल्या घराशीं किंवा बायकोशीं संबंध नसायचा. बायाच्या अंगावरलें फाटकें जुनेर तो पहायचा. पण पेटाऱ्यांतील साडी उचलून त्यानें कधीं बायांच्या अंगावर फेकली नाहीं.

सर्व अर्थांनीं बाया ही टाकलेली बायको होती. पण गरजेच्या वेळीं तिच्याकडे जाऊन चार पैसे मागायला तो कमी करीत नसे. मोचेमाडकर दशावतारी मंडळीनें देवळा-पाशी धर्मशाळेंत तळ ठोकला तेव्हां त्यांना दुपारच्या जेवणाला भाजी नव्हती. तें कळतांच पायांत चप्पल घालून जिवा बाहेर पडला. आपल्या गांवांत दशावतारी मंडळीची गैरसोय व्हावी हें त्याला रुचलें नाहीं. तो तरतरा आपल्या घरीं गेला. शिडी घेऊन घराच्या छपरावर चढला आणि बायानें गवताची गादी देऊन मोठ्या काळजीनें छपरावर पोसलेला भोपळा तोडून तो खालीं उतरला. त्या धड-पडींत त्यानें छपराचे दहावीस नळे फोडले. घरांत गेला आणि पंधरावीस सुपाऱ्या खिशांत टाकल्या. बाहेर आला आणि पानवेलीचीं पाचपन्नास पानें खुडून दुसऱ्या खिशात भरलीं. हें सारें चालूं असताना आंत-बाहेर करीत कुरडी बाया जळजळून फुत्कार सोडीत होती. ओठातल्या ओटात शिव्या मोजत होती. पण जिवानें पर्वा केली नाहीं. 'माझां घर माझी बाईल. घरांत हक्क माझो नाय तर आणखी कोणाचो?' असा उलटा सवाल करून त्यानें भोपळा खांद्यावर घेतला आणि तो धर्मशाळेकडे गेला.

भोपळा, पानें, सुपाऱ्या नाटक्यांच्या समोर ठेवून त्यानें हात जोडले आणि म्हणाला, 'जेवा पोटभर. काय लागलां तर हांक मारा. रवळनाथाच्या पायाकडे दशावतारी मंडळीची गैरसोय झाली तर ईश्वरी कोप होईत माझ्यार!' पुनः एकदां सर्वांना नमस्कार करून तो तिथून निघाला आणि भावणीच्या पडवींत येऊन पडला.

शेवंतीच्या पडवींत भिजलेल्या मांजरीप्रमाणें पडून रहाणें हा त्याचा नाटकाखालोखाल एक आवडता छंद. एकामागून एक पानपट्ट्या तोंडांत कोंबाव्या. विड्या फुकाव्या. संध्याकाळीं नवटांक घेऊन अंग आवळून पडून रहावें हा त्याचा छंदच होता.

जिवा रस्त्यावरून जातांना शेजारून गेला म्हणजे रांट कसाचा मेंढा गेल्याचा भास व्हायचा. आबांना रस्त्यांत पाहिलें कीं बाजूला उभा रहायचा. चपलांतून पाय बाहेर काढायचा आणि जमिनीला हात लावून वंदन करायचा. 'कसा काय जिवा?' एवढें जातां जातां आबा विचारायचे आणि 'तुमची कृपा!' एवढें दोनच शब्द जिवा उच्चारायचा.

तें दृश्य पाहिलें कीं जिवा हा भलताच सभ्य आहे असें कुणालाहि वाटलें असतें. पण तो तसा नव्हता. मेला मुलखाचा खट होता. चालतांना दोन्ही हात कोटाच्या ऐसपैस खिशांत कोंबून तो झुकत झुकत मंदगतीनें चालायचा. चालतां चालतां वळवळती नजर चौफेर फिरवायचा. पालखीच्या गोंड्यासारखी लुटुक लुटुक मुंडी हालवायचा आणि मधूनमधून अक्षता टाकल्या-प्रमाणें सुपारीचे तुकडे थुंकायचा. वाटेंत कोणी ओळखीचा भेटला की 'हांऽऽहांऽऽ!' असें म्हणत उगीच दांत विचकून हंसायचा. पण तेवढ्यांत कुळवाड्याचें बाईलमाणूस नजरेंत आलें कीं तत्परतेनें गंभीर व्हायचा. तिरपी मान करून टवकारलेल्या नजरेनें पहा-यचा आणि निष्कारण खाकरून, ती निघून गेली तरी मागें पहात पुढें चालायचा. बरोबर कुणी असला तर 'ही कृष्णाची बाईल कीं काय? ऑं! एकदम अडली कशी?' किंवा 'ही म्हाद्याची दुसरेपणाची? रांडेची कंबर बरीच सुटली!' असें अचकट विचकट बड-बडत फिदिफिदी हंसायचा आणि विचारमग्न होऊन केसांच्या झुलपात अडकवलेला अण-कुचीदार हीर दातांत खुपसून दात कोरत रहायचा.

माघ पूर्णिमेला रवळनाथाच्या देवळांत जत्रा असायची. त्या रात्रीं एक फक्कडसें नाटक व्हायचें. तें झालें कीं दुसऱ्या दिवशीं तो रवळ-नाथासमोर नारळ ठेवून गुरवाला गाऱ्हाणें घालायला सांगायचा. मग देवासमोर गुडघे टेकून हात जोडून बसायचा आणि म्हणायचा, 'तुझी मंडळी, तुझी पोरां. तू बरकत दी!' तिथून तो आमच्या घरीं यायचा. आबांच्या पायाला हात लावून साष्टांग नमस्कार घालायचा आणि म्हणायचा, 'तुमची कृपा होयी!' मग आबांनीं दिलेला नारळ वांकून हातांत घ्यायचा आणि परत जायचा. दुसऱ्या दिवशीं भल्या पहांटे उठून तो आपल्या आठदहा नटमंडळी-सह गांवपर्यटनाला निघायचा. मग दोन चार दिवस आसपासच्या गांवांतून येणाऱ्या माणसां-कडून बातम्या कळायच्या. आज जिवाचें नाटक मळेवाडला झालें. उद्यां रात्रीं साता-र्ड्याला. परवा गोव्याच्या हद्दींत. नाहीं म्हटलें तरी जिवाचा मुक्काम गोव्यांत अधिक असा-यचा. गोव्यांतील माणसें खरी रसिक असें त्याचें प्रामाणिक मत होतें.

गांवोगांव हिंडण्याचें काम बहुधा पायींच चालायचें. क्वचित बैलगाडी मिळायची. सर्व नटांच्या डोक्यावर आलटून पालटून पेटारा चढायचा. रात्रीच्या नाटकांतला राजा सकाळीं डोईवर पेटारा घेऊन काबाडकष्ट करायचा. मी कलावंत आहे, पेटारा उचलण्याचें फालतु काम करणार नाहीं असें कुठल्या नवख्या नटानें म्हटलें तर त्याची मनधरणी करण्याच्या फंदांत जिवा फारसा पडत नसे. शेलक्या शिव्या हांसडण्यापासून तो कंबरड्यावरती लाथ घालण्यापर्यंत सारे प्रकार करून तो मोकळा व्हायचा आणि तरीहि जागोजागीं ठरल्या दिवशीं त्याचीं नाटकें उभीं रहात.

कोणत्याहि गांवात शिरला कीं जिवा प्रथम देऊळ गांठायचा. देवळांत अगर देवळा-जवळच्या धर्मशाळेंत पेटारे उतरायचा. मग एक नारळ हातांत घेऊन आणि खांद्यावर जरीचें उपरणें टाकून तो गांवांतल्या मुख्य मानकऱ्याकडे जायचा. तेथें मानकऱ्याच्या पायावर लोटांगण घालून नाटकाला हजर रहाण्याचें आमंत्रण द्यायचा. त्याच्या खाकेंत एक प्राचीन चोपडें असायचें. तें चोपडें घेऊन तो गांवांतल्या सर्व बामणांच्या घरीं जायचा. नाटकाचें आमंत्रण द्यायचा आणि चोपडें उघडायचा. त्या चोपड्यांत गांवोगांवच्या बामणांची, त्यांच्या पूर्वजांचीं नावें होतीं. त्यापुढें त्यांनीं वेळोवेळीं दिलेल्या पैशाचे आकडे होते. आठ आण्यापासून दोन रुपया-पर्यंतचे आंकडे. ते आंकडे दाखवून त्या त्या धन्याकडून तो पैसे गोळा करायचा.








आमंत्रणाचा फेरा आटोपून जिवा पुनः धर्मशाळेवर यायचा. दरम्यान गांवांतल्या महारानें ढोल बडवून जिवाच्या नाटकाची दवंडी पेटलेली असायची. जिवाचें आमंत्रण संपेपर्यंत धर्मशाळेंत तीन दगड रचून नटांनी भात, आमटी, भाजीचें जेवण तयार केलेलें असायचें. कोट, टोपी काढून पेटाऱ्यावर टाकीत आणि दारूच्या वासाचे भपकारे सोडीत, चला, थोडी थोडी पिऊन या असा सर्व नटमंडळींना आग्रह करायचा. ते सारे बाटल्या मारून येईपर्यंत जिवा निपचित पडून रहायचा. मग सर्वांचीं जेवणें होईपर्यंत दुपारचे तीन वाजत असत.

संध्याकाळीं काळोख पडतांच देवळाच्या मंडपांत बामणांच्या घरचे बांक येऊन पडत. प्रत्येकाच्या मानाप्रमाणें बाक ठेवले जात असत. त्या बांकावर बामणांचीं माणसें बसत असत. सव्वांत एक रुंदसा बाकहि असे. तो बांक म्हणजे नाटकांतल्या पात्रांचें आसन. वर आंब्याच्या पानांचीं तोरणें लटकत असत. आणि दोन्ही बाजूला पेट्रोमॅक्सचे कंदील भक्-भक् करीत जळत असत. बस्स. एवढीच नाटकाची तयारी. बाकी सारी जागा प्रेक्षकानीं अडवलेली असायची. क्वचित खूपच गर्दी उडली आणि लोकांनीं आपले हातपाय राजाच्या सिंहासनापर्यंत पसरले तर खुद्द राजाच लोकांच्या हातापाया पडून 'जरा मारून घ्या' असा लोकशाही पद्धतीनें सल्ला द्यायचा.

नटांनीं एका अमूक वेळीं हजर राहिलें पाहिजे, अमूक वेळीं रंगून तयार राहिलें पाहिजे, अमूक वेळीं पडदा वर गेला पाहिजे अशीं जिवाचीं कोणतींच बंधनें नव्हतीं. काळोख पडतां पडतां खुद्द जिवाच बाहेर पडायचा. हातांतल्या लाबट टॉर्चचा प्रकाशझोत टाकून किट्ट काळोखातून भावणींचीं घरें शोधून काढायचा. आंत शिरायचा. पूर्वीची ओळख पटायची. 'कितें गो बाय?' अशी सुरवात करून पाऊस पाण्याच्या गोष्टी करतां करतां सलगींत यायचा.

आमच्या गांवांत मी खूप प्रयोग पाहिले होते. पण खुद्द गोव्यातच त्याचा एक प्रयोग पहाण्याची संधि मला मिळाली होती. तिथें जिवाचें नाटक पहाण्यासाठीं लोटलेली अलोट गर्दी मी जन्मात विसरणार नाहीं.

रंगलेला विडा चघळत भावणीकडून जिवा देवळापाशीं आला तेव्हां नाटक पहाण्यासाठीं लोकांची अक्षरशः भाऊगर्दी उडाली होती. काळोखांतून देवळाकडे येतांना उजेडासाठीं प्रेक्षकांनीं बरोबर आणलेल्या जळत्या चुडल्यांचा डोंगर बाजूला रणरण पेटत होता. पोरांचें रडणें, म्हाताऱ्यांचे खोकणें, बायकांचीं भांडणें आणि मानकऱ्यांचें खेकसणें यांचा संमिश्र आवाज गोंगाटत होता. विड्या, चिलमी, गुडगुड्या यांचा धूर तोंडातोंडासमोर तरंगत होता. कुळवाडी प्रेक्षक एकमेकांना पक्के खेटून जमिनीवर बसले होते. बामणांचीं माणसें आपापल्या बांकावर बसलीं होतीं. महार-चांभार आपापल्या पोराबाळांना खांद्यावर घेऊन एका कोपऱ्यांत उभे होते. कांहींजण धर्मशाळेच्या छपरावर चढून बसले होते. एकदां नाटक कधीं सुरू होतें असें सर्वांना झालें होतें.



स्त्री पार्टीच्या जमान्यातील मूळ पुरुष तो हा— 'सोनू शिंपी! पुढें पुढें 'फरकॅप' घालून जे स्त्री पार्टी भाव खात होते त्यांचे गुरुघराणें सोनू शिंप्याचेंच. पहिली फरकॅप त्यानेंच घातली.

मध्यभागीं ठेवलेल्या बांकाशेजारी मृदंगी कोंबड्यासारखी मान उडवीत होता. पायपेटी-वाला नाना सूर काढीत लंबकासारखा दोन्ही बाजूनें हेलकावे खात होता. झांजवाला तर छातीवर हनुवटी टेकून ऐसावर येऊन झांज कुटीत होता. खरें म्हणजे लोकांच्या गोंगाटापेक्षां झांजेचा आवाज कमी पडतो म्हणून तो झांजे-वरचा सूड उगवीत होता. हा सारा प्रकार ऐन रंगांत आला तेव्हां कुठें जिवा आणि त्याचे झिलगे रंगून तयार झाले. त्यावेळीं जवळ जवळ अकरा वाजत आले होते.

थोड्या वेळानें मृदंगापाशीं लोकरी शाल पांघरून बिडी फुंकत आणि च्यु च्यु खोकत बसलेला एक म्हातारा उठला. त्यानें आपल्या शालीचें एक टोंक दुसऱ्याकडे दिलें आणि अंतरपाट धरावा तशी शाल धरून पडदा तयार केला.

तेवढ्यांत 'गणराज गजानना' असें गाण्याचे बोल बसल्यासारखे नमनगीत झांजवाला गुणगुणूं लागला. त्या गीताचे बोल कानावर बसत असतांनाच पडद्याच्या आंतून पडद्याला बसणाऱ्या धक्क्यावरून आंत कसला तरी नाच चालला आहे हें प्रेक्षकांना कळून चुकलें. त्यांची उत्कंठा क्षणाक्षणाला वाढूं लागली आणि त्या प्रमाणांत प्रेक्षकांचा गोंगाट थोडा थोडा कमी होऊं लागला. कांहीं वेळानें पडदा बाजूला गेला आणि पडद्याची शाल पांघरून म्हातारा बाजूला बसला. विझलेली कानावर ठेवलेली बिडी त्यानें पुनः पेटवली आणि समोरच बसलेल्या गणपतीवर तो बेफिकीरीनें धूर सोडूं लागला.

आपल्या मूळच्या दोन काळ्या हातांना लाल रंगाचे दोन लाकडी हात बांधून आणि एक सोंडीचा लालबुंद मुखवटा तोंडावर धरून पोट खपाटीला गेलेला गणपती बाकावर बसला होता. बरोबर सरस्वतीहि आली होती. कमरेला मोराचा मुखवटा बांधून सरस्वती मोरावर स्वार झाली होती. तिनें कमरेच्या मोरासकट नाच केला आणि घामाच्या धारांनीं तिचा पोल्का चिंब भिजला तेव्हां तिनें नाच थांबवला.

सरस्वतीचें किंवा राणीचें काम करणारा हा सोनू शिंपी स्त्रीपार्टी म्हणून चार गांवांत प्रसिद्ध होता. गांवांत असला म्हणजे शिंप्याचें काम करायचा आणि दशावतारी पेटारा गांवपर्य-टनाला निघाला कीं त्याचें दुकान बंद व्हायचें. तीन महिन्याचा दौरा आटोपला कीं पुनः दुकान उघडायचा. तो जाण्याआधीं शिवायला आलेल्या चोळ्या तीन महिन्यांनंतर शिवून तयार व्हायच्या. नाटकापुढें सोनूनें गिऱ्हाई-कांची कधींच फिकीर केली नाहीं. राठ हिरवी-गार दाढीमिशी, उन्हामुळें काळवंडलेला चेहरा, विड्या ओढून करपलेले ओठ, बसके गाल, शिरा उमटलेले हात आणि हाताच्या हालचालींबरोबर दंडावर नाचणाऱ्या बेडक्या असें सोनूचें शरीर होतें. आणि तरीहि स्त्रीपार्ट करणारा हा सोनू देखणा नट आहे अशी त्यांची गांवोगांवीं ख्याति होती. स्त्रीपार्ट करावा तर


अनुक्रमणिका

सोनूनेंच असें कौतुकानें लोक म्हणत असत.

सरस्वती घामाच्या धारा शालूच्या पदरानें पुसत असतांना सूत्रधार आणि गणपति यांचा संवाद झाला. आणि हत्तीच्या सोंडींतून माणसाचा आवाज निघून सूत्रधाराला म्हणजे नाटक-मंडळीला आशीर्वाद मिळाला. पुनः पडदेवाल्यानें पडदा धरला आणि गणपतीचा प्रवेश संपला. तो प्रवेश संपताच कुणाच्याहि बापाला कळूं देणार नाहीं अशा पैजेवर सूत्रधार धूमधडाक्यानें गाऊं लागला. त्याचें गायन संपून पडदा बाजूला होतांच अरुंद बांकाचें सिंहासन करून राजा वर आरूढ झाला होता. बाजूला प्रधानजी उभा होता.

कोणत्याहि क्षणाला तलवार बाहेर काढावी लागेल अशा पद्धतीनें कमरेच्या तलवारीवर हात ठेवून राजा म्हणाला, 'पर्धानजी, आपल्या या राज्याची चोख यवस्था कशी काय आहे ?'

पण प्रधानजीनें उत्तरच दिलें नाहीं. त्याचें राजाकडे लक्षच नव्हतें. खुद्द राजाकडे पाठ फिरवूनच तो उभा होता. राजाच्या दरबारांत आपल्याला फक्त उभा रहाण्यापुरती जागा मिळावी म्हणून तो प्रेक्षकांकडे रदबदली करीत होता.

'अरे जरा पाय ठेवण्यापुरती तरी जागा द्या !'

'जरा मारून घ्या—मारून घ्या' खुद्द राजाहि प्रधानजीच्या मदतीला आला. राजाच्या सिंहासनाला चिकटून बसलेल्या कांहीं लोकानीं किरकोळ हालचाल करून राजाचा आदर केला. पण ते तरी मागें कुठें जाणार ? जागा होती कुठें ?

मग जागच्या जागीं फिरत राजा पुनः म्हणाला, 'पर्धानजी, आपल्या या राज्यांत व्यवस्था चोख हाये का नाय ?'

'महाराज, आपल्या राज्याची यवस्था चोख ठेवलीसा पन...'

प्रधानजीच्या या उत्तरावर खरें म्हणजे राजानें बोलायला हवें. पण प्रधानजीकडे दुर्लक्ष करून राजा एकदम कावून ओरडला, 'ए आये, माझ्या आये, जरा जागा सोडून बस. उठ, आधीं उठ... !' कारण राजाच्या रेशमी अंगरख्याचें टोक शेजारींच बसलेल्या बाईच्या नथींत अडकलें होतें आणि अक्षरशः नाक खालीं घालून ती बाई आपली नथ सोडवून घेत होती.

नथींतून राजाची मुक्तता होतांच प्रधानजी पुनः म्हणाला, 'महाराज, आपल्या राज्याची यवस्था चोख आसा. पन...'

'पर्धाणजी, पन म्हनजे काय ? साफ साफ बोला.' असें म्हणत राजानें कुणाला तरी पायानेंच मांजरासारखें बाजूला लोटलें.

'महाराज, आपल्या राज्यांत दैत्यांचा लई तरास होतो.' असें म्हणून पायांत अडकलेल्या एका पोराला उचलून प्रधानजीनें दैत्यालाच फेकल्याप्रमाणें फेकून दिलें.

'काय म्हणता ? माझ्या राज्यांत दैत्य ? मी त्यांणा ठार मारून टाकनार हाये !' अशी गर्जना करीत राजानें म्यानाशीं झटपट करीत गंजलेली तलवार कशीबशी बाहेर उपसली. उजव्या हातांत तलवार धरून तलवारीचें टोक त्यानें डाव्या हातांत धरलें आणि एकदां डावा पाय तर एकदा उजवा पाय वर उडवीत वाद्यांच्या गजबजाटात बराच वेळ तांडवनृत्यासारखें नृत्य केलें. तें नृत्य चालू असतांना अनेकांच्या हातापायांवर राजाचे दणकट राजेशाही पाय पडून कांहीं काळ रडण्या-केकाटण्याचा गोंगाट झाला आणि तेथेंच युध्दाला पुरेशी मोकळी रणभूमि तयार झाली.

तेवढ्यात अस्मानाला भेदून जाणारी एक आरोळी उठली. लोक दचकून इकडे तिकडे पहातात न पहातात तोंच आणखी आरोळ्यामागून आरोळ्या उठल्या. आरडाओरडा करीत थयथय नाचत शंखासूर खुद्द प्रेक्षकांतूनच वाट काढीत पुढें आला. वाटेत सापडलेल्या बिचाऱ्या प्रेक्षकाना राक्षसी कृत्याचा प्रत्यय देत तो थेट दरबारांत घुसला.

त्यांचा वेष संपूर्ण काळा होता. तोंडाला अबीरबुका फासून तो भयानक दिसत होता. त्यांतून फक्त सफेत डोळे तेवढे उठून दिसत होते. केसाची टोकें कमरेला टेकलीं होतीं. मेलेल्या माणसाच्या कवट्या, हाडें, कापडी सर्प गळ्यांत अडकवून शंखासूर आला होता. त्यानें आपली तलवार उपसली आणि त्या अरुंदशा जागेंत त्यानें अक्षरशः थयथयाट घातला. आरोळ्या ठोकीत तो सिंहासनावर म्हणजे बाकड्यावर चढला तेथून त्यानें पुनः एक आरोळी ठोकून वरच्या छताला हात लागेल

अशी उडी मारली. त्या उडीबरोबर वर टांगलेलीं आंब्याच्या पानांचीं तोरणें तुटून खालीं आलीं. बस्स ! प्रेक्षक पुरेपूर संतुष्ट झाले. ह्यो जिवा !' असे संतोषाचे उद्गार सर्वांच्या तोंडून निघाले.

शेवटीं राजा – शंखासूर – विदुषक यांची शाब्दिक देवघेव झाली—आणि प्रकरण ठरल्याप्रमाणें हातघाईवर आलें. वाजंत्र्यांनीं सारें बळ एकवटून वाद्यें वाजवलीं आणि लढाईला अनुकूल असें वातावरण निर्माण केलें. बराच वेळ त्यांचें तुंबळ युध्द झालें आणि अखेर सहा फूट लांबीचा शंखासूर गारद झाला. मरून पडतांच पडदेवाल्यानें पडदा धरायला हवा होता पण विडी विझवून उठेपर्यंत पडदेवाल्याला उशीर झाला आणि डोळे मिटून मरून पडलेल्या जिवाला वाटलें पडदा धरलेला आहे. म्हणून तो उठला आणि बाजूला पळाला. तें पाहून 'जिवंत झालो, जिवंत झालो' असें ओरडत प्रेक्षकानीं गलका केला.

त्यानंतर मध्यन्तराचे वगैरे चोचले न करतां पहाटेपर्यंत नाटक चालू होतें. दरम्यान पावलोपावलीं लढाया झाल्या. राणीचें गायन झालें. विदुषकाचा विनोद झाला. भाषणें सुचवणारा प्रॉम्पटर नव्हता. सर्वांचा भाषणें तोंडपाठ होतीं असेंहि नाहीं. पण आख्यानाच्या अनुरोधानें जें ज्यावेळीं सुचेल तें तोंडाबाहेर यायचें. शेवटीं विदुषकानें आणि एका दासीनें दोन थाळ्या प्रेक्षकांत फिरवल्या. प्रत्येकानें पैसा दोन पैसे टाकले. कुणी आणा टाकून दोन पैसे उचलण्याच्या निमित्तानें सहा पैसे उचलण्याचा प्रयत्न केला. तो प्रयत्न उघडकीला येतांच त्यानीं दासीच्या हातच्या टपल्या खाल्ल्या. शेवटचें सामुदायिक गीत झालें तेव्हां पहिला कोंबडा आरवला होता.

दुसऱ्या दिवशीं जिवा जेव्हां आपल्या मूळ वेषांत गांवांत फिरूं लागला तेव्हा अनेक गांवकऱ्यांनीं त्याची पोट भरून स्तुता केली. 'हांग यो रे जिवा. मावशी चा घेऊन वच.' असें म्हणून कुणी त्याला चहा पाजला. कुणी बिस्किटें दिलीं. कुणी फर्मास विडी पुढें केली. कुणी गुडगुडी आणली.

तीन महिने गांवोगांव हिंडून जिवा परत आला.

येतांना मोठे पैसे कनवटीला होते असें नाहीं. पण जमाखर्च बरोबर भागला. कुणाच्या पोटाला कांहीं कमी पडलें नाहीं. तेवढ्यावरच सर्वांचें समाधान झालें. ●●●

**भारतीय सेनेचा विजय असो**
**भारतीय स्वातंत्र्य अमर असो**
**कमी बोला अधिक काम करा**





*उत्तर सीमा इंच इंच लढवायला 'नेफा'ला जायचें आहे ना? मग 'नेफा' संबंधीं माहिती नको का? नेफा म्हणजे काय? त्याची भौगोलिक, सामाजिक आर्थिक परिस्थितीची—सुलभ चर्चा या लेखांत केलेली आहे...!*




—श्री. रा. टिकेकर

आमच्या उत्तर सरहद्दीवर दोन ठिकाणीं चिनी हल्ल्यामुळें गोंधळ माजला होता. (१) लद्दाख आणि (२) नेफा. काश्मीर संस्थानचा पूर्वेकडील भाग लद्दाख (राजधानी लेह) म्हणून आहे. नेफा हा आसामच्या उत्तरेकडील मुलुख. आज 'नेफाची' ओळख करून घ्यायची आहे.

नेफा हें नांव बनावट आहे. नॉर्थ ईस्ट फ्रॉंटिअर एजन्सी या इंग्रजी नांवाचीं आद्याक्षरें मिळून बनलेला शब्द म्हणजे नेफा. यूनो, युनेस्को, फाऊ, युनिसेफ...हीं जशीं आद्याक्षरानीं बनविलेलीं नांवें, तसेंच नेफा हें बनलेलें नांव आहे. नेफांत कोणकोणते जिल्हे येतात-त्यांत लोक कोणते रहातात- किंवा तिथल्या भाषा कोणत्या, हा मनोरंजक अभ्यास आहे. कारण हीं नांवें, ह्या हद्दी आमच्या कानांवर पूर्वी कधीं पडल्या नाहीत.

खुद्द आसामचीं राजकीय स्थित्यंतरें किती तरी झालीं. मग त्याचें शेपूट म्हणून असलेला हा सरहद्दीचा प्रदेश निरनिराळ्या नांवांनी राजकारणांत मिरविला. नेफा हें सुद्धां सरहद्दीचें नांव आहे—आणि एजन्सी ह्या शब्दावरून बोध होतो कीं तिथला कारभार साधा नसून 'खास' आहे. मग तो लष्करी असो कीं मुलकी असो.

ब्रिटिश अमदानींत अशा 'एजन्स्या' पुष्कळ होत्या. त्यांचा अधिकारी बहुधा पोलिटिकल एजंट असे. प्रथम कांहीं दिवस हे पोलि. एजंट प्रत्यक्ष गव्हर्नरच्या देखरेखीखालीं काम करीत. पण पुढें गव्हर्नर जनरलशीं त्यांचें नातें जुळलें. वायव्य सीमेवरील चार पांच एजन्स्या होत्या. सेंट्रल इंडिया एजन्सी होती. सदर्न मराठा एजन्सी होती—असा खास अधिकाराचा प्रदेश एजन्सीचा म्हणून ओळखत. तिथला कारभार जरा वेगळ्या प्रकारें चालवितात. सध्यां आपणांस आहे तसें स्वराज्य नेफांत नाहीं—म्हणून तो भाग 'एजन्सी'चा. त्याचीं स्थित्यंतरें आसामच्या राजकीय स्थित्यंतराबरोबर बदलत गेलीं.

पहिल्या ब्रह्मी लढाईनंतर (१८२६) आसाम ब्रिटिशांकडे 'संरक्षणा' साठीं आला. आसाम प्रोटोक्टोरेट असा त्याचा त्यावेळचा हुद्दा. काचर प्रदेश स. १८३२ मध्यें आणि आणखी तीन वर्षांनीं 'जंतिया टेकड्या' हा प्रदेश आसामांत सामील झाला. नंतर अपर हा सलग इलाखा बंगालमध्यें समाविष्ट केला. (स. १८३९). बंगालवर लेफ्ट. गव्हर्नरचा अंमल असे. त्याच्या अखत्यारांतून आसाम वेगळा केला (स. १८७४) आणि त्यावर स्वतंत्र चीफ कमिशनर नेमला. बंगालची फाळणी झाली तेव्हां (स. १९०५)








बंगालची जोडी जमली. पूर्व बंगालमध्यें आसामचा समावेश झाला. पण फाळणीच मुळीं रद्द ठरल्यावर (स. १९१२) पुनः आसाम चीफ कमिशनरच्या ताब्यांत गेला. मॉटफर्ड सुधारणानुसार आसामही गव्हर्नरच्या ताब्यांतला इलाखा ठरला (स. १९२१) आणि पुढें दोन सभागृहांचा प्रांत असा आसामचा हुद्दा इतर इलाख्याप्रमाणें जाहीर झाला.(स. १९३७). पण तेव्हां देखील नॉर्थ ईस्ट फ्रॉंटियर ट्रॅक्टस् नॉर्थ काचर हिल्स सबडिव्हिजन, नागा हिल्स, लुशाई हिल्स या प्रदेशाचा उल्लेख 'एक्स्क्लूडेड एरियाज'–(वगळलेला मुलुख) म्हणून होऊं लागला. 'पार्शली एक्स्क्लूडेड' (निम्माशिम्मा वगळलेला) मुलुख असाही कांहीं भाग होता. तो म्हणजे गारो व मिकिर पहाडी प्रदेश, खाशी आणि जंतिया टेकड्यांचा भाग.

स्वराज्य सुरू झाल्यानंतर या पहाडी मुलुखाकडे पहाण्याची दृष्टी बदलणें भाग पडलें. ह्या प्रदेशांतल्या टोळ्या किती–त्यांच्या भाषा किती यांची गणती सोपी नाहीं. एका टोळीची हद्द कोणती–दुसरीची सुरू होते ती कुठून इत्यादी वाद अद्याप नीटपणें सुटले नाहींत. पण एवढें खरें कीं येथें नाग (नागा) लोक रहातात. त्यांची आपसांत समजूत अशी कीं आम्हांस स्वातंत्र्याचा ताम्रपट मिळालेला आहे. निरनिराळ्या जाती पोटजातींत आम्ही विभागलों असलों तरी आमचें स्वातंत्र्य अबाधित राहिलें पाहिजे. त्यांच्या या समजुतींत भर पडली मिशनऱ्यांच्या चिथावणीची. सुमारें पाऊणशें वर्षें–शंभर वर्षें–सुद्धां त्या टेकड्यांच्या प्रदेशांत निरनिराळ्या ख्रिश्चन मिशननीं धर्मप्रसाराचा गोंधळ माजविला. टोळ्यांच्या टोळ्या म्हणे आपण होऊन 'आम्हांला येशूच्या कळपांत घ्या' अशी प्रार्थना करूं लागले. म्हणून 'प्रदेशाच्या प्रदेश' ख्रिस्ती झाला !! प्रार्थना काय कुणाही देवाची करावी—किंवा करूंही नये. पण 'राष्ट्र' तर मानलें पाहिजे ना ? आम्ही स्वतंत्र आहों–आम्हांला 'नागस्थान' वेगळें हवें असें म्हणणारा फिझो मिशनऱ्यांनीं चिथावलेला नागा होय.


भारतीय संस्कृतीनें घालून दिलेल्या मर्यादा पूर्णपणें पाळणाऱ्या या नेफावासी अंगना

बंडखोरी सुरू करून नागांनीं आमच्या सरकारी अधिकाऱ्यांना त्रास द्यायला सुरुवात केली. मारामारी, जाळपोळ, लुटालूट हे प्रकार सुरू झाले. नागांचें म्हणणें तरी काय तें समजावून घेण्यासाठीं अनेक प्रयत्न झाले. त्यांच्या सभा, परिषदा भरविल्या. त्यांचीं शिष्टमंडळें दिल्लीस गेलीं. त्यांची मागणी मुख्य अशी कीं आम्हांला वेगळें ठेवा——आसामशीं आमची मोट बांधूं नका. म्हणून निरनिराळे अधिकार देऊन, निरनिराळीं नांवें ठरवून (जिल्हा, प्रदेश, कमिशन, एजन्सी) नागांचें मन वळविण्याचा प्रयत्न आमच्या सरकारनें पुष्कळदां केला. पुष्कळ अधिकाऱ्यांची मेहनत त्या कामीं खर्च पडली. पण आसामचे गव्हर्नर असतां सर अकबर हैदरी (आय. सी. एस.–हैदराबादी अकबर हैदरींचे सुपुत्र) यांनीं एक करार त्या नागांशीं ठरविला त्यांतील एक कलम फार घातुक ठरलें. स. १९४७ चा हा करार. त्यांत सवलत अशी कीं, 'दहा वर्षांनंतर (हिंदुस्थानांत सामील होऊन राहिल्यानंतर १० वर्षांनीं) वाटल्यास नागांना वेगळें होण्याचा– (हिंदुस्थानी कारभारांत अलग होण्याचा) हक्क आहे. हैदरींची अपेक्षा होती कीं दहा वर्षांतल्या अनुभवानें नागा वेगळे होण्याची कल्पना विसरतील–त्यांना अलग व्हावें असें वाटणार नाहीं. पण ही अपेक्षा फोल ठरली. नागांनीं नेमका तोच आग्रह धरला.

तेव्हां नागा प्रदेश आसामी कारभारांतून वेगळा काढून त्यावर दिल्लीची प्रत्यक्ष देखरेख असावी–असा पर्याय कांहीं दिवस व्यवहारांत आला. आसामपासून नागा प्रदेश निराळा काढण्यासाठीं त्याच्या चतुःसीमा निश्चित केल्या तेव्हां ठरलें कीं—

१ कामिंग फ्रॉंटियर डिव्हिजन;
२ सुबान्सिरी ,, ,,
३ शायांग ,, ,,
४ लोहित ,, ,,
५ तिरफ ,, ,,
६ च्यूएनसांग ,, ,,

अशा सहा 'जिल्ह्यां'चा मिळून हा नागा प्रदेश बनावा. पण 'नागस्थान' सारखें नांव देऊन भलत्या आकांक्षा वाढूं नयेत म्हणून त्यास नेफा--नॉर्थ ईस्ट फ्रॉंटिअर एजन्सी असें नांव ठेवलें. त्याचीं आद्याक्षरें [इंग्रजी] नेफा [एन्. ई. एफ. ए. ] अशीं होतात.

नेफामध्यें दहा लाख वस्ती आहे. क्षेत्रफळ सुमारें ३३००० चौ. मैलांचें. पण लोक पांगलेले— लहान झोपड्यांत रहाणार; १०–१२ झोपड्या एकत्र असल्या का झालें त्यांचें गांव. बांबू आणि वेत—वेत आणि बांबू, हीं दोन झाडें त्यांच्या पांचवीला पुजलेलीं. घरासाठीं त्यांचा उपयोग, शेतीसाठींही त्यांचाच आधार. भांडी बांबूंचीं–कांहीं आभरणें–प्रावरणें (त्यांना वस्त्रें म्हणतां येणार नाहीं) सुद्धां बांबूची असतात. नित्याचा 'पेला' देखील बांबूचा. शेतीचा नांगर बांबूचा–ओढ्यावरचा पूल बांबूचा-असें बांबूमय जीवन त्यांचें आहे. बैठ्या चाती (कातण्यासाठीं) आणि बैठे हातमाग (विणण्यासाठीं) हीं त्यांच्या जीवनांतलीं मुख्य यंत्रें. औषधपाण्यासाठीं अजून मंत्रतंत्र, जादुटोणा, 'बळी' असे उपाय त्यांच्यांत चालतात.

नागा टोळ्यांचीं नांवें विचित्र वाटण्यासारखी असलीं तरी त्यांत 'डफळे' हें मराठी नांव आढळतें. आपल्या परीनें लोहित विभागांतले 'मिशमी' लोक श्रीकृष्णभगवानाशीं नातें जोडतात. रुक्मिणी ही म्हणे लोहित विभागांतली–तिचें माहेर 'कुंडिन' हें लोहितमध्यें आहे !!






अघोर, अका, उफळा, मिरी, मिशमी, मोनपा, कोन्याक, चांग, फोम, संगतम, यिंचिंगुर, सेमा, खिम, युंगम, अगामी, चकसांग, लोहत, आओ, झेलियांग रेंगमा, कुकी, काचरी, मिकिर...पदम, तांगासा, वांचो, नोकटे...अशी यादी पुष्कळ मोटी होईल. पुष्कळांना लिपी नाहीं. त्या फक्त बोलभाषा आहेत–म्हणून रोमन लिपी त्यांजवर लादण्याचा प्रयत्न मिशनऱ्यांनीं केला. त्या बोलभाषा असल्यानें रेडिओवर त्यांचा उपयोग होतो. गोहत्ती केंद्रावरून अशा अलिखित भाषांचे कार्यक्रम नेहमीं होत असतात.

तरीही आश्चर्याची गोष्ट अशी कीं लोहित विभागांत आज मितीस ब्रह्मकुंड आणि विशन नगर (विष्णुनगर) हीं मोठीं गांवें आहेत. इथल्या मिशमीनीं द्वारकाधीश श्रीकृष्णाशीं नातें जोडल्याचें आधीं सांगितलेंच आहे. दफभूम (तपोभूमी ?) हें तर १५ हजार फूट उंचीचें शिखर सरहद्दीवर आहे. सुबान्सिरी हें नांव सुवर्णाशीं निगडित दिसतें त्या नांवांचा प्रदेश सुबान्सिरी नदीच्या उभय तीरांवर आहे, ह्या प्रदेशाकडे मिशनऱ्यांनीं दिलें तितकें लक्ष अद्याप कुणींच दिल नव्हतें. म्हणून आजचा बांका प्रसंग ओढवला आहे.



भगवान श्रीकृष्णाचे मेव्हणे आणि मेहुण्या. रुक्मिणी देवीच्या माहेरच्या माणसांचा हा नोकझोंक.

गेल्या ५–७ वर्षांत मात्र हुषार, समयज्ञ आणि धोरणी अधिकारी पाठवून त्या लोकांसाटीं बऱ्याच सोई उपलब्ध करण्याचें धोरण सरकारनें अवलंबिलें आहे. शाळा, शेतीला मदत, दवाखाने, रस्ते, कपडा–लत्ता... इत्यादि विविध सहाय्य त्या डोंगराळ मुलखांत पोंचत आहे. पूर्वीच्या परकीय प्रवाशांनीं ह्या प्रदेशांतल्या नागांना 'नरभक्षक' [हेड हंटिंग] ठरविल्यामुळें, त्यांचीं भयानक वर्णनें लिहून ठेवल्यामुळें तिकडे जाण्यास पुष्कळ जण कचरत असें वाटतें. आता ती भीति निराधार टरली असल्यानें.' नेफा 'त आमच्यासारखी लोकशाही 'राजवट' सुरू होईल–तो प्रदेश आमच्या सारखाच राज्यकारभारांत भाग घेईल–अशी आशा करूं या.





मुंबईतल्या कुठल्याशा बोळकंडीत ती बहिऱ्या-मुक्यांची शाळा चाले. रस्ता भरवस्तीचा! सदा खडखड चालायची! चालण्याची सोय नाहीं, इतकी गर्दी! आणि टॅक्सीनं जायचं म्हणजे सुद्धां सतरादां One way च्या पाट्या आडव्या यायच्या! कसंतरी वळणा वळणानं त्या तीन मजली जुनाट घरापुढें थडकलं कीं पहिल्या मजल्याच्या गॅलरीच्या डोक्यावर पिवळ्या लाल रंगानं रंगवलेली ती शाळेची घेडगुजरी पाटी दिसे. पुढचा तो ओशट-लेला मोठा दिल्ली दरवाजा, आंत मोटं आंगण, आंगणाचा उपयोग फक्त सभोंताली पसरलेल्या बिऱ्हाडांनी टाकलेल्या घाणीसाठीं आहे, असें वाटे. त्यांतच असंख्य कबुतरांचा थवा फडफड करी. एका कोपऱ्यांत वर जाण्याचा जिना अगदीं अंग चोरून उभा असे. असे दोन जिने चढल्यानंतर एकदांची ती शाळा दिसे. शाळा म्हणजे एकच मोठा हॉल–! भिंतीवर दाटीवाटीनं नाना प्रकारचे फोटो लागलेले–मध्येंच मोठ्या अक्षरांत ओम्, दाराच्या चौकटींत तुकारामाचे अभंग... ! हॉलच्या पलिकडे मुख्याध्यापिकेची पार्टिशन केलेली.खोली; आणि त्याच्यापुढें भेटायला आलेल्या माणसासाठीं टाकलेलं एक मोडकं बाक... !

शाळेचा आज दहावा वाढदिवस–! बाहेरचा हॉल पाहुण्यांनीं भरत होता. कुजबुज वाढत होती. गडबड धांवपळ भरतीच्या लाटे-सारखी क्रमाक्रमानं उंचावत होती. केवळ नेल्लाच्या कर्तृत्वानं हे दिवस दिसत होते. ह्याची प्रत्येकाला जाणीव होती. प्रथम दोनच मुकीं मुलं घेऊन शिकवत बसणारी नेल्ला आतां ह्या हजार मुलांच्या शाळेची मुख्या-ध्यापिका होती. आणि तिचं कर्तृत्व बघायला मी आलों होतो. केवळ ती माझी बायको म्हणून कौतुक करायला नव्हे.

नेल्ला, युरोपियन, पोलीश. पण पाश्चात्य बाईचे नखरे मात्र तिनं कधींच केले नाहीत. कधीं ओठाला सुद्धां रंग फासला नाहीं कीं गालावर लाली चढवली नाहीं. तिचा तो पांढऱ्या गुलाबासारखा फिकट गोरा रंग–खोल काळे डोळे, पण फार भेदक, डोक्यासरसा कांपलेला तो काळ्या सरळ केसांचा बॉबकट! सदा पांढरे शुभ्र कपडे तिला जास्त आवडा-








*जुना व नवा असा दोहोंचा समन्वय करून, एका वेधक शैलीनें लिहिणाऱ्या आपल्या प्रत्येक गोष्टींत नवनवीन प्रश्न हाताळणाऱ्या लेखिकांत इंदु साक्रीकर हें नांव आज मानाचें स्थान मिळवित आहे. एका गूढ समस्येवरील ही गोष्ट क्षणभर धुंदी आणील.........*

---

यचे ! उंच टांचाचे पांढरे बूट वाजवीत ती चटपटीतपणें चालूं लागली कीं सगळ्या कामांचा तात्काळ उलगडा पडे. फार क्वचित हंसे; सदा उग्र अबोल; ओठांच्या घट्ट भिंतींतून चुकून सुद्धां एकादा शब्द बाहेर पडायचा नाहीं.

आताही दवाखान्यातून यायला मला फार उशीर झालेला पाहून ती पुढें निघून गेली होती. माझ्यासाठीं थांबली नाहीं. शाळेचा पत्ता शोधणं म्हणजे गर्दीच्या दाट धुक्यांतून पुढें कसातरी मार्ग काढणें ! तिथे सगळ्याच वाटा आडमुठ्या झालेल्या– ! रस्ता इतका अरुंद कीं दोरीवरून चालल्यासारखं वाटावं... !

मोठ्या मिनतवारीनं, कसातरी पत्ता शोधीत मी शाळेजवळ आलों; तेव्हां बाहेरच्या गॅलरींत बरेचसे लोक घुळघुळत उभे होते. अंगणांतल्या कबुतरांसारखेंच विखुरलेले– !

मध्येंच कबुतरांच्या रोखानं बाजूच्या चाळींतून भिरकावलेला दगड पत्र्यावर मोठ्यानं वाजत होता, त्या कर्कश आवाजांवर तरंगणारी ती फडफड. कापसाचा पाऊस वाटावा तशी गळणारी 'पिसे... !'

दोन जिने चढून धांपा टाकीतच मी वर गेलो. कांहीं मंडळींनीं मला ओळखून आंत बसायला सांगितलं.

मी मुख्याध्यापिकेच्या खोलीबाहेरच्या बांकावर बसलो. बाहेरचा हॉल उदबत्तीच्या मंद सुवासानं भरून गेला होता. येणाऱ्यावर स्वागताचा वर्षाव होत होता. खोलींत मात्र चुलींत मोडून लांकडं घालावीत तसा भांडणाचा काडकाड आवाज होत होता.

ओरडणारा आवाज अर्थातच नेल्लाचा !

'तुम्हाला होत नसेल तर सोडून द्या ! पण असं चालणार नाहीं. अगदीं वेळेवर शिकवायला यायला पाहिजे !' ती मोठ्यांदा गरजत होती.

'असं काय करतां ! आज इतक्या वर्षात माझ्या हातून कधी कामाची हयगय झाली आहे कां–!' दुसरी बाई काकुळतीनं विनवित होती.

'मग कालच असं व्हायचं काय कारण !'

'लहान मुलगा आहे माझा...येऊं देईना तो !' विवाय ... नाहीं मला !

'काय झालं आहे !

'तसं कांहीं नाहीं !' ती बाई जरा अडखळून थांबली; बोलताना जरा लाजून अर्धवट हंसल्यासारखीही वाटली.

'हंसता काय ! थट्टा वाटते तुम्हांला ? आणखी !

'कशाची हंसते ! आतां हे चवथ्यांदा दिवस राहिले त्याचीच मला लाज वाटूं लागली आहे'

'मिसेस कितने ! नेल्ला एकदम किंचाळली. 'तुम्ही आपल्या नवऱ्याला फार लाडावून ठेवलं आहे. तुम्हांला माहीत नाहीं; आता जग किती पुढें गेलं आहे ते ! कांही उपाय माहित नाहीत !'

'हं !' त्या बाईनी एक दीर्घ सुस्कारा सोडला. तेव्हां नेल्ला पुन्हां चवताळून बोलूं लागली. 'हे पहा ! उद्यापासून तुम्ही सुट्टी घ्या ! पूर्ण बऱ्या झालात म्हणजे या. तुमच्या व्यक्तिगत अडचणींसाठीं ह्या मुक्या असहाय माणसांचं नुकसान करण्याचा तुम्हाला कांहीही अधिकार नाहीं !'

ती बाई भरल्या सुरांत म्हणाली, 'असं नका हो करूं ! माझ्यावर अवलंबून आहेत माझीं मुलं ! पांच सहा महिने तरी अगदीं नीट काम करीन मी !'

'नाहीं !' नेल्ला करड्या सुरांत ओरडली आणि ती बाई स्फुंदु लागताच आणखीनच तार सुरांत बोलूं लागली, 'रडण्याचं कांही कारण नाहीं, आतांच घरीं जा पाहूं.—'

मोठ्या कष्टानं डोळे कोरडे करीत ती बाई खोलीबाहेर पडत होती. तेव्हां नेल्ला टेबलावरची घंटा जोरजोरानं वाजवित होती. मलाही कसंतरी होऊं लागलं, गर्दीगर्दीनं उठत मी आंत गेलो. माझ्या मागोमागच शाळेचा गडी धांवत पळत येत होता. माझ्याकडे एकदां हंसून पहात–ती गड्याला उग्रपणें म्हणाली, 'काय रे ! बाहेर जमले कां सारे ! हे कागद सेक्रेटरी साहेबाना दे... !'

'जी !' असं म्हणून तिच्या हातातले कागद घेत तो मोठ्या अदबीनं वांकला आणि बाहेर गेला. तिनं माझ्याकडे एकदां निरखून पाहिलं. मी सहज विचारलं,

'कशाला–इतकं बोललीस, उगीच त्या गरीब बाईला !'

'गरीब कसली ! कामचुकार ! तुला कांहीं कल्पना नाहीं येणार ! मोठा डॉक्टर म्हणवतोस पण... !' असं म्हणत मोठ्यांदा हंसत ती माझ्याजवळ आली. माझ्या खांद्यावर एक चापट मारून तिनं ओढूनच मला बाहेर आणलं.

बाहेर आता बरीच माणसं जमली होती. अजून मुख्य पाहुणे यायला वेळ होता. ते येईपर्यंत जनरल बॉडीच्या सभेचा कांहीतरी कामें आटपतील असं कुणीतरी सुचवलं. नेल्लालाही ती सूचना पसंत पडली आणि तिच्याच अध्यक्षतेखालीं हा अभूतपूर्व सभा सुरू झाली. मुक्यांची सभा ! मला मोठी गंमत वाटत होती. शब्दाशिवाय वादविवाद सुरू झाले. टेबलाजवळ–हातात एक लाबलचक कागद घेऊन एक मुका सेक्रेटरी उभा होता. पुष्कळसे हातवारे करून तो भाषण करीत होता. त्याच्या खास स्वतःच्या भाषेंत ! मोडलेले, मुरगळलेले फेंगडे शब्द–त्याच्या वासलेल्या तोंडांतून बाहेर पडत होते. जणुं ते त्याच्या तोंडांत मावत नव्हते. तेव्हां मध्येंच फेंस उडावा तसा फस्








अनुक्रमणिका



' ......अहो पण दारूबंदी रद्द झाली म्हणतात ना ?'

असा आवाज होत होता. त्याला विरोध करणारा दुसरा एक मुका गृहस्थ मध्येंच तावातावानें उठत होता. त्याचं बोलणं म्हणजे नुसते कर्कश वडवांकडे सूर...शब्द नाहींत! शब्द जसें त्याच्या घशांत अडकून बसले होते. आणि त्याच्या कानामात्रांना तो जबरदस्तीनें ओढून बाहेर काढीत होती--अशीं उत्तरं प्रत्युत्तरं चाललीं होती. आणि नेल्ला ह्या सर्व वादविवादाला अगदीं संथ सावकाश उत्तरं देत होती. तिचं ते कुजुबुजत्या हलक्या सुरांतलं बोलणं हॉलभर सर्वांना समजत होतं.

बहिऱ्या लोकांनाही ऐकूं येत होतं.

असा एकदाचा वार्षिक अहवाल पास झाला. मग अगदीं पाठीमागे कोपऱ्यांत बसलेल्या एका मुक्यानं किर्तने बाईंचा प्रश्न काढायला सुरवात केली. तेव्हां नेल्ला ताडकन् उठली. आणि जनरल बॉडीच्या सभेंत हा प्रश्न घेऊं शकणार नाहीं, असं सर्वांना अगदीं खडसावून बजावलं...तरी सुद्धां बऱ्याच विद्यार्थ्यांचं समाधान होईना. कारण किर्तनेबाई जवळ जवळ सर्वच विद्यार्थ्यांना आवडाच्या. त्यांची सर्वांना फार सवय झाली होती. त्यांची उत्तम शिकवण मनमिळावूं गोड स्वभाव! प्रत्येकाला त्या हव्याहव्याशा वाटत. एवढंच नव्हे तर त्या दिसल्या नाहींत तर चुकल्यासारखं वाटे. अशी त्यांच्यावर कितीतरी मुलं अवलंबून होतीं. आज एवढ्या मोठ्या समारंभात किर्तनेबाई कुठेंच दिसेनात ह्या गोष्टीचं कित्येकाना आश्चर्य वाटत होतं कुजबुज चालू होती. कुणी म्हणत, कांहीं मुलांना त्या सागूनहि गेल्या पुन्हा येणार नाहीं म्हणून! नेल्ला आणि किर्तनेबाई ह्यांचं कांही बिनसलं असावं असाहि कांहींना तर्क केला.

तेव्हां किर्तनेबाईंचा विषय निघतांच जो तो आपापल्या परीनं त्यांच्या अशा जाण्याबद्दल असंतोष प्रगट करूं लागला. हॉलमध्यें जरा गोंधळच उडाला. शेवटीं संस्थेचे हितचिंतक पण निमंत्रित असे एक पाहुणे बोलायला उठले. अजून मुख्य पाहुण्यांचा पत्ता नव्हताच. नेल्ला आतल्याआत विलक्षण चिडली होती. पण करते काय! पाहुणे निमंत्रित पडले. मुकाट्यानं गप्प बसून चरफडत त्यांचे भाषण ऐकूं लागली. निमंत्रित पाहुणे प्रथम तावातावानें शिस्तीवर बोलूं लागले. शेवटीं आश्चर्य म्हणजे किर्तनेबाईंचीं बाजूही त्यांनीं मोठ्या प्रभावीपणें मांडली. सर्व विद्यार्थ्यांना सहाजिकच अत्यानंद झाला. त्यांनीं जोरजोरानं टाळ्या पिटायलाही सुरवात केली. तेव्हां मात्र नेल्लाच्या संतापाला पारावार उरला नाहीं. विशेषतः निमंत्रित म्हणून बोलावलेल्या एखाद्या परक्या माणसानं शाळेंतल्या ह्या खासगी विषयाला हात घालावा हें तिला बिलकूल सहन होईना. पाहुण्यांना मध्येंच थांबवीत ती चढ्या सुरांत म्हणाली, 'किर्तनेबाईंना कोणीही काढले नाही. त्यांना रजा दिली आहे!'

' पण ती रजा त्यांना नको आहे!' ' आम्हांलाही नको आहे!' एका विद्यार्थ्यानें वाकड्यातिकड्या सुरांत बोलायला सुरवात केली. त्याबरोबर ते निमंत्रित पाहुणेही म्हणाले, ' बरोबर आहे!'

' ते तुम्हांला सांगण्याची गरज नाहीं!'

नेल्ला एखाद्या वाघिणीसारखी गरजली.

' किर्तनेबाई आणि मी काय करायचं तें पाहून घेऊं...!'

' पण!' पाहुण्यांना कांहीं बोलायचं होतं. पण नेल्लाला कांहीं एक ऐकायचं नव्हतं. रागाच्या आवेशात ती एकदम पुढें सरकली. आणि तिनं ताडकन पाहुण्यांच्या थोबाडींत लगावली. तिचा तो अभिनिवेश पाहून पाहुणें गारच झाले. क्षणभर सर्वच हतबुद्ध होऊन बसले. काय करावं, काय बोलावं हें कुणालाच सुचेना. मीही लगबगीनं पुढें होऊन नेल्लाजवळ जाऊन उभा राहिलो. आणि तिला आंवरायचा प्रयत्न करूं लागलो. ते पाहुणे चागलेच प्रतिष्ठित होते. स्वतःबरोबर त्यांनीं आणखी कांहीं प्रतिष्ठितांचा घोळकाही आणला होता. नेल्लाचं तें मुलखा वेगळं वागणं पाहून प्रत्येकजण आ वासून नुसता मूढपणें बघत राहिला. तिचा हात धरण्याचं धाडस एकालाहि झालं नाहीं. आपल्या कृत्याची ही प्रतिक्रिया पाहून नेल्ला आणखी आवेशाने पुढें सरकली. माझा हात हिसडून ती पाहुण्यांना दुसरा ठोसा लगावणार इतक्यांत तिचा उचललेला हात मागच्यामागें धरला गेला. इतका वेळ स्तब्ध उभी राहिलेली एक मध्यमवयीन स्त्री नेल्लाचा हात जोरानें पकडून मोठ्यांदा ओरडत होती; ' मोठी असशील युरोपियन तूं! म्हणून इतकी माजलीस काय! शाळा मोठी केलीस म्हणून आजपर्यंत तुझी अरेरावी सहन केली. आज मात्र कळस झाला. मी सुद्धां उपाध्यक्ष आहे. थांब, एकाच्या ऐवजी, दहा मारते तुझ्या थोबाडीत!'

असं बोलतां बोलतां तिनं नेल्लाचा हात गच्च आवळून धरला होता. तिची क्रुद्ध, जळजळीत नजर नेल्लाच्या सर्वांगावर फिरत होती. केस विस्कटल होते, तिचा तो रणरागिणीचा अवतार पाहून नेल्ला जास्तच चवताळेल असं मला वाटलं होतं. पण आश्चर्य म्हणजे त्या पेटत्या नजरेकडे पाहून तीही हबकून गेली होती. एखाद्या अपराध्यासारखी मान खाली घालून ती स्तब्ध बसली होती. अगदीं बधिर होऊन! रागानं तळपणाऱ्या तिच्या डोळ्यांत पुन्हां तो थंड निर्विकारपणा आला.

इतक्यांत मुख्य पाहुणे कशीबशी गर्दीतून वाट काढीत मोठ्या कष्टानं तिथें येऊन पोचले. आपल्यालां खूपच उशीर झाल्यांबद्दल त्यांनीं नेल्लापुढें मान वाकवून भरघोस माफी मागितली. त्यांच्या तोंड भरून हंसण्याला नेल्लानं कृतिम हंसत साथ दिली. जस कांहीं, काहींच झालं नाहीं असा समारंभ पार पडला. सर्वजण कठपुतळ्यासारखे स्तब्ध होतें. मूढ यांत्रिकपणें सर्व कामं उरकलीं जात होतीं.








आणि समारंभ संपला तरी त्याच तटस्थतेत सारीजणं डुंबली होती. ह्या सर्द वातावरणाला पुन्हां काडी लागूं नये म्हणून समारंभ संपतांच मी घाईघाईनं पुढं झालो, आणि नेल्लाला जवळ जवळ ओढूनच बाहेर आणलं, तीही माझ्याबरोबर मुकाट्यानं आली.

मी शांतपणें मोटर सुरूं केली, तेव्हां रस्त्यांत आमच्या गाडी भोंवतीं मोठा घोळका जमला होता. कोणी हंसत होते, कोणी वाटेल ती कुचेष्टा करत करीत होते. कोणाच्या हातांत दगडही होते, नेल्लाचं कशाकडेच लक्ष नव्हतं. अर्धा रस्ता ओलांडला तरी ती कांहींच बोलली नाहीं. तिचे थंड, निर्विकार डोळे मात्र किंचित ओलसर वाटत होते. ओठ सुकले होते. बऱ्याच वेळानं ती अगदीं कोरड्या सुरांत म्हणाली, 'हें काम मी सोडणार आहे!'

'ह्यासारखं सगळंच फुकट समाजकार्य तूं सोडून दे!'

'कांहींतरी केल्याशिवाय बरं वाटणार नाहीं, मला!' ती खिन्नपणें म्हणाली.

'मग क्लबमध्यें जा–! कितीतरी चांगले क्लब्स आहेत इथें बायकांचे! काय कमतरता आहे आपल्याला पैश्यांची तरी! क्लबमध्यें जावं, खेळावं, खूप मजा करावी! कशाला ह्या अपंग लोकांत वेळ घालवतेस–! त्यांचा समजही पांगळाच असतो!'

'खेळांत वेळ घालवणं जमत नाहीं खरं!'

'मग काय लोकांची दुःखंच पाहिली म्हणजे बरं वाटतं तुला!' मी टोचून विचारलें.

'हो!' तिचा स्वर कर्कश होता. तिच्या तोंडावरचा तो विचित्र विकट भाव पाहून मी बावरूनच गेलो. कांहीं न बोलता मी समुद्राच्या रस्त्याकडे गाडी वळवली आणि गाडीचा वेग मंद करीत तिच्याकडे हंसून पहात म्हटलं, 'जरा फिरूया इथें! येतेस!'

'नको' ती तुटकपणे म्हणाली.

'मग!'

'पाहिजे तर इथेंच गाडी उभी कर! गाडींतच बसूं समुद्राकडे पहात!'

'बाहेर किती छान आहे बघ तरी!
तुला कधींच फिरावंसं वाटत नाहीं कां ग!'

'नाहीं!'

'कां!'

'समुद्र मला आवडत नाहीं, त्याच्याकडे पाहिलं कीं उगीचच वाटतं पोटात भयानक जखमा ठेवून बाहेरून शांतपणाचं सोंग करणारा नाटक्या आहे तो!'

'मी मोठ्यांदा हंसूं लागलों, तरी ती निश्चल होती. तिच्या उग्र चेहऱ्यावर हास्याची पुसटती रेषा सुद्धां उमटली नाहीं. माझं अस्तित्व सुद्धा विसरून ती अगदीं एकटक समुद्राकडे पहात राहिली. सभोंवताली अंधार प्रकाशाचा पाठलाग करीत लगबगीनं येत होता आणि भयभीत झालेली विवस्त्र प्रकाशाची रेषा क्षितिजाच्या घाटमाथ्यावर पळून आली होती. लाल पिवळा दिवस जसा क्षितिजावर उलटा उभा होता. तशी समुद्रावरची गर्दीहि हळूहळूं ओसरत होती. इतकावेळ काठावर बसलेलें एक तरूण जोडपं एकमेकांच्या खांद्यावर हात टाकून हंसत खिदळत समोरून येत होतं. माझी नजर सहजच त्या तरूणीवर खिळली. ती उगीचच हंसत होती. हंसताना त्या तरूणावर तिनं आपल्या शरीराचा सर्व भार टाकून दिला होता.

जय जवान :

## कडक शिस्तीचा परिणाम !

'संगिनी कशा रोखाव्यात ?' ह्याचं शिक्षण एक सार्जेंट जवानांना देत होता. आपल्या कडक स्वभावामुळें तो सार्जेंट त्यां जवानांमध्यें अप्रिय होता. रिकाम्या संगिनी खांद्यावर घेऊन हे जवान त्याच्यासमोर उभे होते. तो सांगेल त्या दिशेला ते संगिनी रोखत होते.

'लक्षांत ठेवा.' तो सार्जेंट गुरगुरला, 'संगिनीचा पहिला नियम असा कीं उगाच ती कोणावर रोखायची नसते; ज्याला मारण्याचं निश्चित केलं असेल त्याच्यावरच ती रोखली पाहिजे.'

आपलं बोलणं जवानांना कितपत समजलं हें पहाण्यासाठीं त्यानें दृष्टिक्षेप केला. तों त्याच्या लक्षात आलं कीं, सगळ्या संगिनी त्याच्यावरच रोखल्या गेल्या होत्या !

नेल्लानं डोळ्याच्या कोपऱ्यांतून माझ्याकडे पाहिलं असावं. शक्य तितक्या रुक्ष आवाजात ती म्हणाली, 'माझ्याशीं तूं उगीच लग्न केलंस ! माझ्याशीं लग्न म्हणजे मूर्तीमंत दुःखाशीं लग्न केलंस !'

ती निर्विकार हंसली.

'कशाचं तरी दुःख करीत राहायलं म्हणजेच तुला बरं वाटतं कां ?'

'म्हणजे !'

'मग असं बोलायचं काय कारण तुला !' मी गुरगुरतच म्हटलं.

विचित्र हंसत ती म्हणाली, 'मला आपलं वाटलं...! तुझ्यासारखंच अगदीं सहज माझं लक्ष त्या जोडप्याकडं गेलं. अन् वाटलं, मी भेटले नसते तर कदाचित तुला अशी छान हंसरी बायको मिळाली असती; आयुष्य सुखांत गेलं असतं...जास्त—!

लंडनमधली ती आपली पहिली भेट आठवते तुला ! ती धुकट ओली रात्र...! मुसळधार पावसांतून मी पळत होते. कॉनसंट्रेशन कॅंपमधून चोरासारखं निसटल्यावर एकसारखं पळावं लागलं. अनेक देशांच्या सरहद्दी तुडवीत ! माणसापासून दूर, दूर...! मला माणूस नको होता. पण...पण...!' ती मध्येंच थांबली. माझ्याकडे रोखूनपहात ती पुन्हां बोलूं लागली. 'त्या रात्रीं काय झालं कोण जाणे ! मी पावसाला कंटाळले. पळायचा कंटाळा आला आणि कुठल्यातरी दरवाजावर थाप मारायची म्हणून वेड्यासारखा तुझाच दरवाजा ठोकला— !' श्वास न घेता ती एकसारखी बोलत राहिली. तिला आणखिही खूप बोलायचं होतं पण माझ्या तें नित्य परिचिरचियाचं होतं. तिचं तेच तेच बोलणं मला ऐकवेना.

संतापानं डोकं फिरून मी जवळ जवळ ओरडलोच, 'सारखं तेच तेच बोलण्यांत तुला काय मिळतं कोण जाणे !'

रागाच्या भरातच मी गाडी सुरूं केली. सरळ घरीं आलों. घरीं आल्यावर सुध्दां तिच्याशीं कांहींही बोललों नाहीं. बाहेरच्या दिवाणखान्यांत मी शांतपणें सिगरेट फुंकीत बसलो. तीही काहीं न बोलता आपल्या खोलींत गेली. असाच कितीतरी वेळ गेला. शेवटीं मलाच रहावेना. हातांतली सिगरेट फेंकून देत मी उठलो. आणि सहज तिच्या खोलींत डोकावून पाहिलं. ती कॉटवर अगदीं शांतपणें पडून राहिली होती. तिची भिजलेली नजर आढ्यावर स्थिर होती. मी दबकदबकं तिच्याजवळ गेलो तेव्हां ती गोठलेली नजर क्षणभर माझ्यावर खिळली. पुन्हां आढ्याकडे पहात ती संथपणें म्हणाली,

'माझा राग आला ना तुला फार !'

'नाहीं ग !' मी आवेगानं तिचा हात धरला. तर ती थंडच होती. माझा हात हिसडून टाकीत—तोंड भिंतीकडे फिरवून ती म्हणाली,

'माहीत आहे मला ! मला मूल झालं असतं तर फार फार बरं झालं असत नाहीं !' मी मूढ होऊन नुसता पहात राहिलो. हिच्याशीं वागायचं कस तेच मला समजेना.

शेवटीं तीच कळवळून बोलूं लागली 'म्हणून माझा राग, राग करतोस ! माहीत आहे मला ! पण काय करूं ! तें शक्य नाहीं. तुला माहीत आहे, कॅंपमध्यें मला काय करावं लागत होतं तें ! मोठमोठीं ओझीं उचलायची, खूप मोठी...! पोटाचे स्नायु तुटले तरी उचलायचीं—! नाहीं उचललं कीं मारझोड, छळ !' आवंढा गिळून ती थांबली. एखाद्या जखमी माणसांनीं एकदम कळ येऊन थांबावं तसं ! जोरजोरानं ती हुंदके देऊं लागली. मी तिला रडूं दिलं. तिच्या खांद्यावर हात टेकून नुसता उभा राहिलो. मनांत साठलेलं दुःख जरा बाहेर आलं म्हणजे बरं वाटेल असा विचार करीत—!

पण ती आतां चढ्या सुरांत बोलूं लागली. भरकटलेल्या आवाजांत, बेभान होऊन...!

'प्रथम मला दिवस राहिले तेव्हां मला किती आनंद झाला होता म्हणून सांगू ! पण—!' एकदम मोठ्यांदा ओरडून तिनं आपले डोळे झांकले. मी शांतपणें म्हटलं.

'कितीदा सागशिल तेच ! जाऊं दे नकोच आपल्याला मूल !'

'तुला काय कळणार माझ्या यातना !' ती कोरड्या सुरांत म्हणाली.

'मला माहीत आहे ! रक्तपाताशिवाय माणसाला कांहीं मिळायचं नाहीं. त्याशिवाय लढाई व्हायची नाहीं. क्रांती नाहीं—स्वातंत्र्य मिळायचं नाहीं...आणि मूल सुद्धां... ! पण हा कसला रक्तपात ! ह्यांत आईच वाहून गेली रे !'

ती आतां भेसूरपणे हातवारे करूं लागली तिच्या दृष्टींत कसलेच भाव नव्हते मी तिच्या तोंडावर हात ठेवला आणि तिला जवळ घेत मोठ्यांदा म्हटलं 'नेल्ला नेल्ला—! काय बोलतेस हे—! ऐकवत नाहीं आता !'

माझ्या डोळ्यात पाणी आलेलं पाहून तिनं एकदम दचकून माझ्याकडे पाहिलं. पहातां पहाता तिची मुद्रा विकट होत चालली. एका हातानं माझं तोंड उचलीत दुसऱ्या हातानं तिनं मला जोरजोरानं मारायला सुरवात केली. संतापानं तिला जोरानं दूर ढकलीत मी ओरडलो, 'नेल्ला— !' अभावितपणें हाताच्या मुठीही वळल्या तिला प्रहार करावेत अशीही तीव्र इच्छा झाली. आजपर्यंत मी मारझोड केली असती तरच ती वठणीवर आली असती. ह्या विचित्र विचारानं क्षणभरच माझ्या डोक्यांत थैमान घातलं. मग हात ढिले पडले. तोंडातून शब्द फुटेना. रागानं थरथरतच मी बाहेर आलो.

माझ्यापुढें फक्त धुकं पसरलं होतं दाट, ओशट धुकं— ! जीव गुदमरत होता. श्वासही धड घेता येत नव्हता. कुठेतरी पाऊस पडत असावा. पण दिसत नव्हता. त्याचा गारवाही माझ्यापर्यंत पोचत नव्हता. आणि मी धुक्यापासून लांब कुठेतरी एकसारखा पळत राहिलो.

● ● ●







अनुक्रमणिका




**दीपावलीकडे अभिप्रायार्थ पुस्तकें पाठवितांना नेहमी २ प्रति पाठवाव्यात म्हणजे निश्चित अभिप्राय देणें सोईचें होतें. १ प्रत असल्यास नुसती पोंच दिली जाते.**

**– संपादक**

समीक्षक **श्री. केशव मेश्राम**

## शब्दांत बंदिस्त केलेल्या मनोव्यथा

**स**तत चांगलें लिहिणें ही तारेवरची कसरत आहे. इतकेंच नव्हे तर सतत लिहिणें ही सुद्धां एक साधनाच म्हणावी लागेल. सतत चांगलें लेखन करण्यासाठीं कलवंतहि तसाच जबरदस्त असावा लागतो. मराठीमध्यें चांगलें आणि सतत लिहिणारे जे कांहीं मोजके कथालेखक आहत त्यांत श्री अरविंद गोखले ह्यांना फार वरचा क्रमांक द्यावा लागेल. ‘ व्रती ’ हा गोखल्यांचा ताजा कथासंग्रह.

ह्या संग्रहांत एकूण अकरा कथा आहेत. अडुळसा, व्रती, फणा, हातचा हरि, नागमोड आणि चकवा ह्या सहा कथांमध्यें नायिकेची व्यथा गुरफटली आहे. ‘ अपरिमिता ’ हिचाही समावेश ह्यांच्यांतच करावा लागेल. स्त्रियांच्या दुःखांशीं ह्या संग्रहापुरते श्री. गोखले समरस झालेले दिसतात. ‘ अडुळसा ’ मधील सीता आणि अमलाडी, ‘व्रती’ मधील माधुरी, ‘फणा’ कथेंतील सरोज, ‘ हातचा हरि ’ मधील सुमित्रा ‘नागमोर्डी’तील मीनाक्षी, ‘ चकवा, कथेंतील शारदा हळदीपूर आणि ‘ अपरिमिते ’ तील ‘ ती ’ ह्या साऱ्या स्त्रिया वेगवेगळ्या प्रकारच्या भोवऱ्यांत सांपडल्या आहेत. पण त्या सगळ्यांना स्वतःचें ओज आहे.

गोखले वेगवेगळ्या पार्श्वांवर सारख्याच हुकमतीनें लिहूं शकतात. एकाद्या शाळकरी मुलीचा अहंकार त्यांची प्रतिभा हळूवारपणें उलगडत जाते तर केव्हां संवेदनाशून्य स्त्रीच्या भावभावनांचें विश्लेषण ती लागते. ऑफिसांत कारकुनी करणाऱ्या साध्याभोळ्या मिनाक्षीच्या मनोव्यथांना ती शद्बांत बंदिस्त करते तर कॉलेजांत शास्त्रीय विषयाचें विवेचन करणाऱ्या पण खाजगी आयुष्यांत अपेशी ठरलेल्या सीता आणि अमलाडी ह्या दोन प्राध्यापिकांच्या दुःखाशी ती समरस होते. माकडवाल्या काळूच्या मनांतील रांगड्या प्रीतिभावनेला ते वाट देतात तर आतेष्टासाठीं शरीरविक्रयाच्या आत्मार्पणाला मनाशीं भांडणाऱ्या माधुरीच्या डोळ्यांतले हळुवार थेंब श्री. गोखले मोजक्या शद्बात हळूवार टिपतात.

‘ व्रती ’ संग्राहांतल्या चार कथांची मांडणी त्यांनी वेगळ्याच तऱ्हेने केली आहे. अर्थातच ती पद्धती जुनी असली तरी तिच्यांत फसण्याचें, पात्रांचें धूसर दिग्दर्शन होण्याचेच भय अधिक असते. पण गोखल्यांच्या ह्या कथांत मात्र तसें घडलें नाहीं. उलट ‘ उभा जन्म उन्हांत ’ सारखी अत्यंत सामर्थ्यशाली कथा ह्याच प्रकारानें त्यांनीं यशस्वी केली आहे. आत्मनिवेदनाची पद्धती त्यांनीं ‘ उभा जन्म उन्हांत, ’ ‘ व्रती, ’ ‘ आम्हीं ’ आणि ‘ पळतां भुई थोडी ’ ह्या कथांत वापरली आहे. भावाचें बेबंद वर्तन पाहतांना आपल्या देवतातुल्य वहिनीची आठवण करणारा, त्याच्या प्रेमपात्राला-बतीनला चिडून निनांवी पत्रें खरडणारा आणि विधवा बहिणीनें हंसावें म्हणून स्वतःच्या प्रेयसीकडे-मुद्दकडे दुर्लक्ष करणारा अत्यंत संवेदनाक्षम नायक त्यांनीं निर्मिला आहे. त्यांच्या अपेशाची, अस्वास्थाची ही कथा मनाला चटका लावून जाते.

घरच्या माणसांची व घराची विस्कटती घडी बसविण्यासाठीं पूर्वायुष्यांत परपुरुषाची शय्यासोबत करणारी माधुरी पण ह्याच सुखाची चटक लागल्यामुळें तेंच जुनें पापाचरण करण्याचा आग्रह करणारे ते आतेष्ट आठवणारी माधुरी आपणास अस्वस्थ करून जाते.

‘ एकीला नवरा मानल्यावर, एक संसार थाटल्यावर, मुलं पोसल्यावर...अशा शब्दांत मी स्वतः गुदमरत असतांनाच वाचकाचीहि विलक्षण उलघाल होते. ‘ व्रती ’ हें नांव संग्रहाला दिलें तें सार्थ वाटतें. ‘ आम्हीं ’ ह्या कथेला उपरोधिकतेची फार मोठी धार लाभली आहे. कॉन्ट्रॅक्टरच्या येथें साधी हरकामी चाकरी करणाराचें नशीब युद्धानें कसें फळफळलें आणि त्याच साध्या माणसानें छंदीफंदी व चैनेल माणसांत–पुढाऱ्यांत– कसें रूपांतर झालें हें विशद करतांना श्री. अरविंद गोखल्यांनीं सामाजिक व्यंगावर नेमकें बोट फार कुशलतेनें ठेवलें आहे.

‘ पळता भुई थोडी ’ ही एका कलंदर-बेबंद पत्रकाराची रम्य भावकथा आहे. क्रीडाक्षेत्रांत अपेशी ठरलेल्या नवऱ्याची-ज्याच्या प्रातीसाठीं बापाविरुद्ध बंड पुकारणारी वेजू नंतर त्याच नवऱ्याविरुद्ध बंड करते. तिच्या प्रगतीचाच नवरा द्वेष करूं लागतो आणि अखेर त्या नवऱ्याचा एकाएकी मृत्यू झाल्याची बातमी कळतांच वेजूच्या वर्तनाबद्दल मनांत अनेक शंकाकुशंका निर्माण होऊन समाज काय म्हणेल अशा मनाच्या टोचणीनें धास्तावलेल्या जीवाची ही कथा आहे.

श्री. अरविंद गोखले कथावस्तू आणि व्यक्ति ह्यांची नेमकी नाडी पकडतात. आपल्या इच्छेप्रमाणें तिला वांकवतात आणि हें करीत असतांना त्या व्यक्तीचा व व्ययेच्या नैसर्गिक विकासाला तें कुठेंहि बाध येऊं देत नाहींत. आणि त्यामुळेंच श्री. अरविंद गोखले यांच्या कथा वाचक नेहमी कुतूहलानें वाचतात आणि त्याच गोखल्यांच्या संपन्न शैलींतील ‘ व्रती ’ हा कथासंग्रहहि तो त्याच नवाईनें वाचेल असें म्हणावेंसें वाटतें.

**( व्रती—ले. अरविंद गोखले**
**कॉन्टिनेन्टल बुक-सर्व्हिस, पुणें २**
**किंमत ४ रुपये )**








## रसरशीत जिवंत व्यक्तिदर्शन

मराठी भाषा नित्य नव्या उन्मेषानें बहरत आहे. नवनवीन प्रयोगांची तिच्यांत भर पडत आहे. तिच्या अनुभवाच्या कक्षा एकसारख्या रुंदावत आहेत. मानवी मनांतील अत्यंत सूक्ष्म व गुंतागुंतीच्या प्रमेयांची हळूवार उकल करण्यांत मराठी कथा यशस्वी होत आहे.

'मामाचा वाडा' हा श्री. श्री. ज. जोशी ह्यांचा बहारदार कथासंग्रह म्हणून गौरवितां येईल. आपल्या ओळखीच्या परिसरांतील सामान्य व्यक्ति- त्यांचे स्वभाव, व्यथा, पंगुपणा, फटकळपणा आणि त्यांची जिद्द, जोशी अतिशय एकरूप होऊन व्यक्त करतात. त्यांच्या शब्दाला अनुभवाचें वजन मिळतें. त्यांच्या भावनेला आंतडीचा पीळ गुरफटून टाकतो. संग्रहांत सहा कथा आहेत. व्यक्ति हें त्यांच्या कथेचें माध्यम. त्यांच्या दुःखानें आपण अवाक् बनतो. अशा ह्या साऱ्या व्यक्ति चिरेबंदी वाड्यांत राहतात. दगडमातीच्या, भावनांच्या आणि संस्कारांच्या चिरेबंदी वाड्यांत राहत असतांनाच त्यांचे जें दर्शन आपणास घडतें त्याचा एक खोल सस्कार मनावर कायम राहतो.

'नानूमामा' ही पहिली कथा. नानूमामा आणि तारामामी हें श्रीमंत महाराष्ट्रीयन जोडपें. आपल्याच मुलाला दत्तक घ्यावें म्हणून कोंडाळें करणारें लांबदूरचें नातलग. स्वच्छ फरशी आणि तडा न गेलेल्या अभंग कांचांच्या वाड्याच्या खिडक्या, खेळणाऱ्या मुलांवर डाफरणारी तारामामी आणि त्या जागींतच सूतिकागृह उघडून आपली वांझपणाची हौस पुरवणारी ही मामा-मामीची जोडी अशा प्रसंगाच्या जुळणींतून कथा झेपावत जाते.

'एका लग्नाची हकिगत' ही एक अत्यंत हृदयस्पर्शी दीर्घकथा आहे. संसारांतून निवृत्त होऊन त्यांतील उपाधींकडे त्रयस्तपणें पाहणारे वडील आणि बहिणीच्या लग्नासाठीं धावपळ करणारा त्यांचा मोठा मुलगा अशा स्थितींतच कथेला गति मिळते. अखेर एकदाचें लग्न ठरतें. फक्त थाटामाटांत लग्न झालें पाहिजे अशी वरमाईची इच्छा आणि मग २५ जानेवारी १९४८ ला लग्न ठरतें. मुहूर्त असतो १ फेब्रुवारी १९४८ चा. ह्या दोन्ही तारखा नेहमी सारख्या वाटतात. पण ह्या दोन तारखांच्या मध्यें येणारी ३० जानेवारी १९४८-- महात्माजींच्या क्रूर हत्येचा तो काळदिवस, ७२ तासांचा पुण्यांतील कर्फ्यू ह्या सगळ्या घटना फार वेगानें पुढें येतात आणि मग अशा परिस्थितींत लावलेलें तें लग्न आणि त्या लग्नाची हकिगत मनांत फिरत रहाते. 'पुढें चालला रथ काळाचा' ही थोरल्या आई आठवणी सांगणारी कथा पतिनिधनानंतर रांडमांस चढूं नये म्हणून एकभुक्त राहणारी, स्वतः हालांत असतानाहि परोपकारी वृत्तीची हीच स्त्री वार्धक्यांत माकडहाड मोडल्यामुळें गुवामुताच्या खातेऱ्यांत पिचत असते. त्याच वेळेस भजी, शेव, भेळ खाण्याची इच्छा उसळत असते आणि ही दोन स्थितींतली थोरली आई खूप काळ अस्वस्थ करून जाते.

ह्या संग्रहांतली एक वेगळी कथा म्हणून 'धारा वहती है' ह्या कथेचा उल्लेख करावा लागेल. मानसिक आंदोलनें आणि तरलभावनांचें सूक्ष्म चित्रण ह्यांत यशस्वीपणें केलें आहे. सकाळीं सगळे थंडीच्या गुलाबी कुशींत लोळत असतांना गंगेच्या तगरशुभ्र पाण्यांत मनसोक्त स्नान करतांनाची उन्मन मनोवस्था जोशांनीं यशस्वीपणें शब्दांकित केली आहे.

'काशीताई' आणि 'बाबुभाई' ह्या कथांतील व्यक्ति डोळ्यांपुढें कायमच्या उभ्या रहातात. स्वतः बालविधवा असूनहि भावाचा संसार शिस्तीनें करणारी, स्वच्छतेची भोक्ति, मुग्रण व पैसे न देणाऱ्या यमालाही जेऊं घालणारी काशीताई तिच्या प्रेमळ करारीपणामुळें विसरता येत नाहीं. तर अपंग असून दिलखुलास हंसणारे, बोलूं नये त्या गोष्टी मोठ्यानें--रास वटपणें बोलणारे, छकड्यांतून ऑफिसला जाणारे आणि अर्धांगानें मृत्यू होऊं नये म्हणून भीति बाळगणारे बापूराव स्मरणांत रहातात.

श्री. ज. जोशी कथा उत्कटतेनें सांगतात. सांगत असतांना त्या व्यक्तींशी व त्यांच्या विश्वाशीं तें स्वतः समरस होऊन हरवून जातात आणि वाचकांनाहि हरवून टाकतात. त्यांच्या व्यक्ति सगळ्याच रसरशीत व जिवंत आहेत. अगदीं मोजक्या ओळींतहि ते व्यक्ति मनावर ठसवूं शकतात. 'एका लग्नाची हकिकत'मधील बटाटे घेण्यासाठीं घाई करणारे--केवळ एकदोनदां ओझरता उल्लेख असलेले 'सासरेबुवा' हि विसरताच येत नाहीं.

त्यामुळेंच श्री. ज. जोशींच्या कथांचा वाचकवर्ग फार मोठा आहे. हरिभाऊंच्या सोज्वळ कथा वाचण्यांतच धन्यता मानणाऱ्या पेन्शनरांनाहि त्यांच्या कथा आवडतात तर आताची तरुण पिढीहि त्यांच्या कथांवर आत्मियतेनें चर्चा करतांना आढळते. हेंच त्यांच्या कथांचें यश आहे. साध्या माणसांची उत्कट सुखदुःखें साध्या शब्दांत मांडण्यांत त्यांची शैली आगळेपणा धारण करते. 'मामाचा' हा चिरेबंदी 'वाडा' चिरस्मरणांत राहतो तो ह्यामुळेंच.

(**मामाचा वाडा** ले.-**श्री. ज. जोशी**, प्रकाशक: केशव कोठावळे, मॅजेस्टिक बुक स्टॉल, गिरगांव नाका, मुंबई ४. किंमत ४-५० रुपये.)

●●●

## साभार-पोंच जाने. ६३

**१. पेन सलामत तो—**

वसंत पुरुषोत्तम काळे, मेनका प्रकाशन, पुणें--२. रु. ३-००

**२. विरंगुळा**

संपादक-बजरंग सरोदे, अविनाश प्रकाशन, रोंदळा (जि. अकोला) रु. २-००

**३. गंधवेणा**

गजमल माळी, मराठवाडा साहित्य परिषद प्रकाशन, औरंगाबाद. रु. १-५०

**४. उत्सव**

मंगेश पाडगांवकर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई. रु. ४-००

**५. हिरवे रावे**

जी. ए. कुलकर्णी, पॉप्युलर प्रकाशन. मुंबई. रु. ६-००

**६. उचग**

ले.: भाऊ भालेराव, नवयुग प्रकाशन, अमरावती. रु. ३-००

### वोरा ॲण्ड कंपनी

पब्लिशर्स प्रा. लि. मुंबई. २ यांचीं पुस्तकें.

**बहुश्रुत पुस्तकमाला** (पुस्तक संग्रह) १ ते ७ व ९ ते २१ व २३. प्रत्येकीं किं. ७० न. पै.

**संत संग देई सदा** (पुस्तक संग्रह) १ ते ५: किं. प्रत्यकी ५० न. पै.

सतराशें साठ गोष्टी किं. १ रु.

सत्यकाम जाबाल किं. ७० न. पै.

पर्वताची हांक किं. ९० न. पै.

—पान ७ वरून

व्यवहारांत यशस्वी होण्यासाठीं, 'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ॥' हाच सर्वांत जवळचा आणि सरळ मार्ग आहे याचा विसर भारताचें भाग्य घडविणाऱ्या द्रष्ट्यांना कधींहीं पडला नाही.

ही परिस्थिति श्रीरामचंद्रांनंतर सुमारें दोन हजार वर्षें टिकली. यानंतर बुद्धाच्या विचारांचा उदय झाल्यावर भारताचा तोल सुटून तो दैवी गुणांच्या अतिरेकाकडे झुकला. त्याच्या दाहकतेचा पार उपशम झाला आहे असें भासूं लागलें. आणि अशावेळीं आक्रमणशील अशा ग्रीक परचक्राचा महाभयानक लोंढा शिकंदराच्या सैन्याच्या रूपानें खैबरघाट ओलांडून भारतावर ओघळला.

हा काल भारताच्या इतिहासांतील एक महत्वाचा कालखंड होय. शिकंदराची ही स्वारी न येती तर भारताचा इतिहासच बदलता. कमलाचा सुगंध आस्वाद्य असला तरी त्याच्या तळींचा चिखल सुगंधी नसतो; हातांनीं केवळ वंदनच करावयाचें नसून चपराकही द्यावयाची असते. अतिरेकानें दैवी गुणहि दुर्गुण बनतात; देवांचेहि व्यवहारांत यश मिळविण्यासाठीं आसुरी गुणांचा आश्रय घेतल्यावांचून भागत नाहीं; इत्यादी वस्तुस्थितीचा विवेक तुटावा अशी यावेळीं भारताची परिस्थिति होती. खड्ग पोलादी असलें तरी तें वेळोवेळीं पाजळावें लागतें; बीज जोमदार असलें तरी त्यास वेळोवेळीं शिंपावें लागतें; सुरी सोन्याची झाली तरी उरांत खुपसून चालत नाहीं; अशा गोष्टीच्या विवेकावर जीवनाचा डोलारा उभा असून, खड्ग गंजलें, बीज सुकलें म्हणजे उपाय चालत नाहीं याचा तेव्हां विसर पडावयास आला होता. भारतीय अस्मितेच्या पौरुषावर चढलेल्या राखेनें अंगारच विझला कीं काय असें वाटावेसें झालें होतें. भारताचें ब्रह्मतेज निराधार झालें होतें, क्षात्रतेज लोपलें होतें. अशा प्रसंगीं ॲरिस्टॉटल याचें ब्रह्मतेज आणि शिकंदराचें क्षात्रतेज यानीं हात मिळवून मुसंडी मारली ती थेट यमुनेच्या तीरावर नेऊन पोचविली.

भारताचें सुदैव आणि ग्रीकांचें दुर्दैव म्हणून शिकंदर शें–दोनशें वर्षें अगोदर जन्मला. भारताचें पौरुष जरी यावेळीं नामशेष होऊं घातलें होतें तरी तें नामशेष झालें नव्हतें. त्यामुळें त्याच्यावरचे राखेचे थर झाडून अंगार फुलविण्याचा प्रयत्न तरी झाला. अर्थात पौरुष पुरतें उजाळण्याअगोदर झालेल्या संग्रामांत रावणापुढें जसा भारताचा पराभव झाला होता तसाच शिकंदरापुढेंही झाला. खड्ग नेहमीं घांसून न ठेवल्यामुळें जी नामुष्की यावयाची ती भारताला आली. पण सुदैवानें पुरुषार्थाचा अंगार साफ विझलेला नसल्यामुळें या पराभवांतून विजयाची बीजें प्रकटलीं. रात्रीच्या कुशींतून प्रकटणाऱ्या उषःकालाप्रमाणें या पराभवांतून यशाचीं बीजें स्फुरलीं. अहिंसेच्या अतिरेकांतून आपलीच हिंसा व्हायची याची जाणीव देशाला झाली आणि हां हां म्हणता तें जुनें ब्रह्मतेज आणि तें जुनें क्षात्रतेज कौटिल्य आणि चंद्रगुप्त यांच्या रूपानें उसळून आलें आणि भारताच्या राजकीय पटावरून शिकंदराची नांनानिशी पुसली गेली. गंगा–यमुनांच्या तीरावर पसरलेले ग्रीक काबूल–कंदाहारच्या पलीकडे फेंकले गेले.

चंद्रगुप्ताच्या खड्गांतून प्रकाशलेल्या तेजाच्या शलाका इतक्या प्रखर होत्या कीं पुढें रोमन लोकांनी साऱ्या जगाचा घांस घेण्याची धडपड केली तरी त्यांना भारताकडे डोळे वर करून पहाण्याचें धाडस झालें नाहीं. चंद्रगुप्ताचा नातू अशोक याचा क्षात्रतेजाचा तोल सुटला होता. परंतु सुराज्याच्या अतिरेकी नादांत त्याच्या कुळांतील स्वराज्यच गेलें आणि सत्ता पुन्हा दुसऱ्या समर्थ हातांत जाऊन त्या समर्थ हातांनी भारताचें सुवर्णयुग म्हणून ओळखला जाणारा काल घडविला आणि भारताची तेजोपरंपरा सहस्र वर्षें अव्याहत प्रकाशत ठेविली.

विश्वामित्र आणि श्रीराम, विष्णुगुप्त आणि चंद्रगुप्त, हा जो भारतीय तेजाचा 'शापादपि शरादपि' असा विशेष त्याची परंपरा अखंड चालूच आहे. विद्यारण्यस्वामी आणि हरिहर, रामदास आणि शिवाजी, असे अवतार या परंपरेंत युगायुगांतून घडत आहेत. ते आलेल्या संकटांचा विनाश करून भारताची प्रभा प्रकाशत ठेवीत आहेत. आज पुन्हां अशा अवताराचा भाग्यकाल भारतासमोर आहे.

मागील परचक्रांच्यावेळीं भारतीय मानगुटीवर बसलेला राजकारणांतील तत्त्वज्ञानाचा गोंधळ आजही भारतीय राजकारणाचा तोल बिघडवितांना दिसत आहे. यावेळीं असाही संभव आहे कीं भारतीय पुरुषार्थाविषयीं इतरांचा जो गैरसमज असेल त्यापेक्षां आमचाच अधिक गैरसमज आहे. भारताला स्वातंत्र्य मिळालें तें मोफत मिळालें असें आपणास वाटतें. त्यासाठीं जो त्याग आणि बलिदान केलें गेलें त्याची जमा उरलेली नाहीं. छातीवर संगिनी झेलणार वीर पडद्याआड लोटले गेले. ज्याचा अर्थही कळत नाहीं अशा तत्त्वांचे मुखवटे पांघरणारे मुखपंडित भारताचें भवितव्य स्वार्थी आणि ढोंगी रंगांनीं चितारूं लागले. स्वातंत्र्य हें फुकट मिळालें असें वाटल्यानें त्याची चव उरली नाहीं. त्याच्या रक्षणासाठीं ज्या गुणांची जोपासना व्हावी त्यांच्याकडे दुर्लक्ष होऊन भलत्याच ढोंगाचा उदोउदो सुरू झाला. राष्ट्रपुरुषांना मागें सारून भडभुंजे सिंहासनावर बसले. जी अहिंसा गांधीजींसारख्या वीराग्रणीच्या हातीं परमशक्ति ठरून बलाढ्य ब्रिटिश साम्राज्य हालविती झाली ती आतां दांभिकांच्या हातीं गटारगंगेचें रूप घावत आहे. वीतभर रुंदीचा पंचा नेसून बकिंगहॅम पॅलेसचे दार ठोठावण्याचें सामर्थ्य ज्या महावीरामध्यें








अनुक्रमणिका

होतें त्याचें नांव आम्ही पैसापांसरी उधळीत आहोंत. ज्या आम्ही श्री रामचंद्रांची विटंबना 'राम बोलो मै राम' मधें केली ते आम्ही गांधींना थोडेच दाद देणार ? त्यांचें पवित्र नांव आम्ही आमची तुंबडी भरण्यासाठीं प्रष्टवीत आहोंत. गुणाचा दुर्गुण आपल्या हातीं व्हावा, कमलांची घाणेरी व्हावी, कांचनरजाची वाळू व्हावी असें घडत आहे. पोपटपंचीची पोळी पिकत आहे. हिताहिताचा विवेक सुटला आहे. दिसूं नये तीं दृश्यें दिसत आहेत. दांडी बोथाटी फिरवून ज्यांनीं बल संपदान करावें तीं मुलें नुसतीच सुतकताई करीत आहेत. ज्यांनीं राम, कृष्ण, शिवाजी, घडवावयाचे त्या कौसल्या, यशोदा, जिजा, पोटचीं पोरें उकिरड्यावर टाकून आत्मगौरवांत मिरवित आहेत. अस्मिताही विसरलेला माणूस मानवतेची महती गात आहे.

ज्यांची पूजा व्हावी त्यांना आत्महत्येशिवाय मार्गच नाहीं कीं काय असें भासत आहे. भारताची इतर वाटेल ती प्रगती झाली तरी भारत हा भारत उरणार कीं नाहीं असें वाटत आहे. हें संकट फार भयंकर. परचक्राहूनही हें संकट अधिक भयंकर.

अशा परिस्थितींत चीननें आपणावर स्वारी केली. हेंही संकट भयंकर खरेंच. पण आजवर जीं संकटें आलीं त्यांतून भारतीय तेजाची झळाळी प्रकट होऊन भारतानें भाग्य उजळलें. आतांहि असेंच होणार आहे. ही संकटाची घटिका भाग्य घटिका आहे, सुवर्ण संधी आहे. हें संकट उद्यांचा भाग्यकाल घेऊन आलें आहे. याच्या आंचेत हीण जळून जाणार आहे आणि सुवर्ण चमकणार आहे. राष्ट्रीयता, पौरुष, अस्मिता, पराक्रम इत्यादी जे गुण राष्ट्रोत्कर्षास कारण होतात त्यांचा उत्कर्ष होणार आहे. नुसत्या वशिल्याचे कौल इथें लटपटणार आहेत. ते बंदुकीची गोळी खावयास पुढें सरणार नाहींत. व्यर्थ कोल्हेकुई करणें वेगळें आणि पंचाननासमोर छाती काढून उभें रहाणें वेगळें. त्याला वशिल्याचा दाखला पुरत नाहीं. छातीची मर्दुमकी लागते.

खाणारे वेगळे असतात. करणारे वेगळे असतात. पांचही पांडव कुंतीचे लाडके असले तरी कुंती भीमास अर्धे खावयास देत असे आणि इतर सर्वांस अर्धे. आणि यांत अन्याय नव्हता. कारण अर्धे खाणारा भीम पाऊण कामही एकट्यानें करीत असे. समतेचा खरा अर्थ कुंतीनेंच जाणला होता. कृतिशूरास पायांतळीं घेऊन वाचाशूरास शिरावर घेणें ही समता नव्हे. ही समतेची विटंबना होय. ही विटंबना आतां थांबणार आहे. मानवतेच्या फांपटपसाऱ्यास आंवर बसून अस्मिता पुन्हां तेजाळणार आहे. कोण आपला, कोण पराचा हें कळणार आहे. गोंधळ मिटणार आहे. राख झडणार आहे. तेजाचें स्फुलिंग उसळणार आहे. पराक्रमाचा नवा यशवंत अवतरणार आहे. भारत आपल्या तेजानें पुन्हा तळपणार आहे.

बळाचा माज चढला कीं माणूस उन्मत्त होतो. आंधळा होतो. चाऊ असाच आंधळा झाला आहे. त्यानें आपला खड्डा खणला आहे. भारताच्या भूमींत अकबराची भरभराट होते तर अवरंगजेब टांचा घांसत मरतो हें त्यानें पाहिलें नाहीं. भाई भाई म्हणत तो नुसता स्वस्थ बसता तर वेडा भारत भाई भाई म्हणत त्याच्या अंगाशीं अंग घासून लाल बनता. तें संकट फार घोर ठरतें. पण आपलें सुदैव. मूर्ख चाऊनें आपल्याला लाथ मारली. आपण आतां लाल झालों आहोंत ते संतापानें. आपण ती उन्मत लाथ आतां पकडली आहे. आपला इतिहास आपलें भविष्य सांगत आहे की आपण ती लाथ आतां सोडणार नाहीं; तर जाधांडांतून मोडून, तोडून, पिरगळून काढणार आहोंत. द्रौपदीची छेड काढणें ही गोष्ट सोपी नव्हे. हें दुःशासनाला कळलेंच कळलें. त्यासाठीं तर श्रीकृष्णानें अवतार घेतला आणि त्याचवेळीं त्यांनीं पुढें होऊं घातलेल्या खलांना इशारा देऊन ठेविला आहे कीं जेव्हां जेव्हां तुम्हाला माज चढेल तेव्हां तेव्हां मी अवतार घेऊन खोडकी मोडीनच मोडीन. ●●●















देशाच्या भरभराटी करितां रेल्वेंना अति महत्वाचें काम करावयाचें आहे. देशाच्या रक्षणा करितां आज तर त्यांचे वर अधिकच जबाबदारी येऊन पडली आहे.





**पश्चिम आणि मध्य रेल्वे**

**भारताच्या संरक्षणासाठीं आपल्या रक्ताची, श्रमाची आणि धनाची (सोन्याची) अत्यन्त जरूरी आहे—तें अविलंब द्या**









# नाटकी नसूनहि नाटकांत रंगलेला प्राध्यापक

चालू महिन्यांत दादर येथें नाट्यकलोपासक मंडळाच्या विद्यमानें भरणाऱ्या पन्नेचाळिसाव्या नाट्य-सम्मेलनाचे अध्यक्ष प्रा. अनंत काणेकर नियोजित झाले हें वाचून कुणालाही आनंद होईल. मराठी साहित्याची काणेकराची सेवा आबालवृद्धांना परिचित आहे. शाळेंत असल्यापासून त्यांनीं लेखनास सुरवात केली. देशभक्तीच्या प्रेमानें उफाळलेल्या त्यांच्या प्रतिभेला काव्याचें आकर्षण वाटणें स्वाभाविकच होतें. शालेय वयांत जरी देशभक्तीपर कविता त्यांनीं रचल्या तरी महाविद्यालयाच्या प्रांगणांत प्रवेश केल्यानंतर त्यांच्या प्रतिभेला चतुरस्र अंकुर फुटले. 'चांदराती'तली प्रसन्न प्रीतीगीतें हीं त्यांच्या भावनाशील तरुण मनोवृत्तीची साक्ष देणारी असून मराठी काव्याच्या तत्कालीन चाकोरीबाहेरची अशी सुलभ, मोकळी व सुटसुटित स्वरूपाची असल्यामुळें ती लोकप्रिय ठरलीं. ह्या काळांत ह्या भावगीतांबरोबरच कथालेखनही त्यांनीं केलें. पुढें संजीवनी पाक्षिकासाठीं लिहिण्यांच्या अत्याग्रहानें एक गम्मत म्हणून हाताळलेला लघुनिबंधाचा वाङ्मय प्रकार आपल्या विशिष्ट खुसखुशीत शैलीनें नटवून त्यांनीं रूढ केला. पिकलीं पानें, तुटलेले तारे, शिंपले व मोती, उघड्या खिडक्या इत्यादि त्यांचे लघुनिबंध संग्रह इतके लोकप्रिय झाले कीं त्यांच्या आवृत्त्या निघूनही 'पाहरी शिंदे' हा एकत्रित संग्रह प्रसिद्ध करणें प्रकाशकालाही व्यवहार्य वाटलें. नाट्यप्रांतातली त्याची कामगिरी दुहेरी आहे. 'नाट्यमन्वंतर'चे आद्य प्रवर्तक व सल्लागार म्हणून त्यांनीं केलेलें कार्य प्रायोगिक मराठी रंगभूमीच्या इतिहासांत क्रांतिकारक ठरावें इतकें उल्लेखनीय आहे. त्यांची स्वतःचीं नाटकें मात्र 'नाट्यमन्वन्तरच्या अवतारसमाप्तीनंतर प्रकाशांत आलीं. निशिकांताची नवरी, घरकुल, पतंगाची दोरी, फांस व झुंज इत्यादि नाटकें तसेंच आणखी कांहीं एकांकिका त्यांच्या सहवासांत जाणवणाऱ्या संवादचातुर्याच्या सर्व गुणांची साक्ष देतात. कल्पक कथनशैली, नर्मविनोदाची विजेरी तडफ व पात्रांचें यथार्थ व सुस्पष्ट चित्रण ह्यामुळें रंगभूमीवर हीं नाटकें लोकप्रिय ठरलीं आहेत. त्यांना प्रवासाची असलेली अभिजात आवड त्यांनीं हौसेनें भागवून घेतली. पण देशी-परदेशी प्रवासांत चाणाक्ष नजरेनें त्यांनीं टिपलेले देखावे आणि व्यक्तिविशेष लेखणीनें साकार करून वाचकांना स्वप्नरंजनाचें सुख देणारीं त्यांचीं प्रवासवर्णनें वैशिष्ट्यपूर्ण ठरलीं यांत नवल नाहीं. त्यांच्या वक्तृत्वाचा लाभ महाराष्ट्रीय जनतेला ह्या ना त्या निमित्तानें मिळाला आहेच. प्रासंगिक, परिचयात्मक, चर्चात्मक व अध्यक्षपदावरून वेळोवेळीं त्यांनीं केलेल्या भाषणांत त्यांच्या प्रासादिक प्रज्ञेचा व वैचारिक व्यक्तिमत्वाचा विलास श्रोत्यांना आकर्षित केल्यावांचून राहात नाहीं. सारांश, गेलीं दोन तपांची त्यांची नाट्यसेवा व साहित्यसेवा मराठी वाङ्मयाच्या आणि महाराष्ट्रीय समाजजीवनाच्या कोणत्याही दालनांत त्यांना गौरवपद प्राप्त करून देणारी ठरलेली आहे आणि तो मान त्यांच्याकडे अनेक वेळां आपोआप चालत आला आहे. कवि, कथालेखक, समीक्षक, लघुनिबंधकार, नाटककार, प्रवासलेखक, पत्रकार आणि प्राध्यापक असें अक्षरशः अष्टपैलु साहित्यजीवन तन्मयतेनें व रसिकतेनें जगणाऱ्या काणेकरांची निवड साहित्य व नाट्य-अकादमीचे सदस्य म्हणून होणें अपरिहार्य होतें. त्यांचें वाचन हें त्यांच्या आवडी इतकेंच चतुरस्र पण सखोल आहे. काणेकरांची विशेष कीर्ति म्हणजे त्यांचा मनमोकळा स्वभाव, चतुर संभाषण आणि संग्राहक वृत्ति. मजूरवर्गाच्या मेळाव्यापासून तो मालकांच्या मैफलीपर्यंत, उत्सुक बालगोपाळांपासून तो चिकित्सक वयोवृध्दांपर्यंत, एकाग्र श्रोत्यांपासून तो वावदूक वक्त्यांपर्यंत आणि ग्रामीण घोंगडीपासून तो मखमली गालीचापर्यंत त्यांचें वास्तव्य आणि वक्तव्य सारखेंच लोकप्रिय ठरलेलें आहे. प्रा. काणेकरांच्या ह्या नव्या नियुक्तीनें नाट्याबद्दलचें त्यांचें अनुभवी आणि विचारपरिप्लुत वक्तव्य ऐकण्याची संधी नाट्यरसिकांना मिळून मराठी नाट्यसृष्टीच्या प्रचलित अस्थिर जीवनाला एक नवीन दिशा लागण्याचा सुयोग येईल यांत संदेह नाहीं.

# येग येग विठाबाई



'दीपावली' वार्षिकाचे एक कल्पक माजी संपादक श्री. रॉय किणीकर ह्यांचें 'येग येग विठाबाई' हें नाटक मुंबईच्या भारतीय नाट्य-सहकार संघातर्फे जानेवारीच्या १० तारखेला रंगभूमीवर आलें. मागच्या पिढीतले एक चतुरस्र लेखक, कुशल संपादक व प्रसिद्धी-पराङ्मुख साहित्यिक असा रॉय किणीकरांचा लौकिक असल्यामुळें प्रस्तुत नाटकाकडे त्यांना ओळखणाऱ्या चहात्यांचें व त्यांचें नांव ऐकलेल्या अपरिचितांचें उत्सुकतेनें लक्ष लागलें होतें. रॉय किणीकरांनीं आतांपर्यंत कित्येक मंथ•भरतील एवढें स्फुट लिखाण केलेलें आहे. त्यांचें 'मंगळसूत्र' हें नाटक १९३० सालीं त्यांनीं प्रसिद्ध केलें. त्यानंतर नोव्हेम्बर १९३१ सालीं त्यांची 'देव्हारा' ही एकांकी सुखान्तिका प्रसिद्ध झाली. त्या काळी प्रस्तुत नाटकांचे हौशी कलावंतांतर्फे कुठेतरी तुरळक प्रयोग झाले असतील पण त्यानंतर ह्या साहित्यप्रकाराकडे प्रतिभा आणि तंत्र पूर्णपणें अलगत

असूनही किणीकरांनीं दुर्लक्ष केलें. एवढेंच नव्हे तर इतर साहित्यिक लिखाणाबाबतींतही उदासीन राहून किणीकरांनीं मराठी साहित्याला एक फार मोठा अन्याय केला असा जाणकार समीक्षकांचा त्यांच्यावर प्रेमळ आरोप आहे. प्रस्तुत नाटक किणीकरांनीं दोन वर्षांपूर्वी लिहिलें होतें व त्याचे प्रयोग ह्यापूर्वीच होणेंहि संभवनीय होतें. पण ह्याना त्या कारणानें बासनांत पडून राहिलेलें हें नाटक अखेर रंगभूमीवर आलें. ह्यामुळें त्यांच्या स्नेह्यांना अतिशय आनंद होईल ह्यांत संदेह नाहीं. चटकदार संवाद, सर्वस्पर्शी विनोद, जीवनांतल्या गंभीर मूल्यांची पाठपुरवणी करण्यासाठीं चिंतनात्मक विचारांची केलेली पखरण, समाजांतल्या ढोंगी वृत्तीवर ओढलेले उपरोधिक कोरडे आणि कारुण्याची विनोदाशीं सांगड घालून विशेष परिणाम साधण्यासाठीं योजिलेली कल्पकता ह्या सर्व त्यांच्या अभिजात लेखनगुणांमुळें प्रस्तुत नाटकानें जुन्या स्मृतींना पुन्हां एकदां उजाळा दिला आहे. 'फिनिक्स' पक्षाप्रमाणें राखेंतून जीवन निर्माण करण्याचें वरदान किणीकरांना आहे असें म्हणण्याइतका पुरावा ह्या नाटकानें उभा केलेला आहे. कुटुंबप्रमुखाच्या नीतीमूल्यांना चिकटून राहण्याच्या ध्येयवुध्दीनें एका मध्यमवर्गीय कुटुंबाची वाताहत कशी होते ह्याचें विदारक चित्रण किणीकरांनीं 'येग येग विठाबाई' मध्यें हळुवार हातांनीं केलेलें आहे. ग्रीक ट्रॅजेडीमधल्या 'नेमेसिस' चा कुशल उपयोग मराठी साहित्यांत प्रस्तुत नाटकाइतका परिणामकारक रीतीनें क्वचितच केलेला आढळेल. इप्सित परिणाम साधण्यासाठीं व्याख्यानबाजी उपयोजून किंवा अतिरेकी घटनांची लांबण लावून नाटकाची 'ट्रॅजेडी' करण्याचें जुनें तंत्र न अवलंबता किणीकरांनीं सहजसुलभ संवाद आणि आवश्यक तेवढेंच प्रसंग व पात्रयोजना ह्याद्वारें महाराष्ट्रीय जीवनाचें एक कारुण्यपूर्ण चित्रण समरसतेनें करण्यांत यश मिळविलें आहे. एक कारकून, त्याची पत्नी, मुलगा, मुलगी, स्नेही, मेहुणा, बँक मॅनेजर व भाजीवाली आणि (जरूर म्हणून) एक पोलीस एवढ्या नऊ पात्रांच्या कौटुंबिक वातावरणांत मानवी जीवनांतल्या अपरिहार्यतेला सोबत घेऊन एक यथार्थ आणि उत्कृष्ट दुःखान्तिका सादर केल्याबद्दल किणीकरांचें अभिनंदन करावें तितकें थोडें आहे. इतकी वर्षे वाट पाहिल्यानंतर प्रस्तुत नाटक रंगभूमीवर आणण्यासाठीं त्यांना मिळालेला नटसंच सुदैवानें दर्जेदार व अनुरूप मिळाल्यामुळें पहिल्याच प्रयोगांत प्रेक्षकांना आकर्षित करण्याचें यश किणीकरांना लाभलें आहे. राजा नेने, बाबा वैशंपायन, शंकर घाणेकर ह्या धंदेवाईक नटांच्या तोडीला भरत पांगे, शांता सबनीस व मंजुळा भिडयांसारख्या होतकरू नटांना उभें करणें एक दिव्यच होतें. पण सर्व पात्रांचें सहकार्य, पाठांतर आणि शब्दोच्चार घटलेले व नैसर्गिक वाटले व त्यामुळें नाटक पहाणाऱ्या प्रेक्षकांचीं हृदयें हेलावून गेलीं. ह्या नाटकाचे आणखी प्रयोग जसजसे होत जातील तसतशा दिग्दर्शनांतल्या कांहीं प्रसंगीं दिसणाऱ्या सुरकुत्या सरळ होत जातील. श्री. रॉय किणीकरांचें आम्हीं अभिनंदन करतों व प्रस्तुत नाटकाच्या यशानें त्यांच्या मुन प्रतिभेला फुटलेले नवे अंकुर वाढीस लागून त्यांच्या हातून अशींच चांगलीं नाटकें व इतर साहित्य लिहिलें जावें अशी सदिच्छा प्रगट करतों.

## प्रो. पावेल मार्कोव्ह आणि अज्ञानी श्रोते

गेल्या डिसेंबर महिन्याच्या सात तारखेपासून तीन दिवस महाराष्ट्र सरकार, मुंबई मराठी साहित्य संघ, मुं. म. ग्रंथसंग्रहालय व इंडियन नॅशनल थिएटरच्या विद्यमानें सुप्रसिद्ध रशियन दिग्दर्शक व नाट्यतज्ञ स्टॅनिस्लॉव्हस्की ह्यांचे सहकारी प्रो. पावेल मार्कोव्ह ह्यांचीं व्याख्यानें आयोजिलीं गेलीं. प्रो. मार्कोव्ह हे स्वतः रशियांतले आजचे श्रेष्ठ दिग्दर्शक व नाट्यनिर्माते आहेत. त्यांनीं रशियन भाषेंत नाट्यावर अनेक लेख व ग्रंथ लिहिले असून 'सोव्हिएट थिएटर' हा त्यांचा ग्रंथ इंग्रजींत उपलब्ध आहे. त्यांनीं आतांपर्यंत जगांतल्या प्रमुख देशांना भेटी देऊन रशियन रंगभूमीच्या वाटचालीवर माहितीपूर्ण व्याख्यानें दिलीं आहेत. प्रस्तुत व्याख्यानसत्रांत 'स्टॅनिलाव्हस्की पद्धतीची रंगमंचरचना' हा विषय त्यांनीं निवडून त्यावर माहितीपूर्ण असें विवेचन केलें. त्यांना स्वतःला इंग्रजी बोलतां येत असल्यामुळें हीं भाषणें इंग्रजींत अनुवादित करून तयार करण्यात आलीं व ती त्यांच्या उपस्थितींत वाचून दाखविण्यांत आलीं. ह्या व्याख्यानांची जाहिरात विशेष न झाल्यामुळें म्हणा अथवा तांत्रिक विषय आणि अप्रसिद्ध परकीय व्याख्याता ह्यामुळें संघमंदिरांत श्रोत्यांची उपस्थिति अगदींच सुमार होती. शेवटच्या दिवशीं नंतरच्या दुसऱ्या एका सभेसाठीं संघमंदिरांत जमलेल्या प्रचंड श्रोतृसमुदायाला पाहून व्याख्यात्याला अमाप उत्साह आला आणि प्रश्नोत्तरांच्या कार्यक्रमाला उत्तरें देतांना त्याला आवरणें कठीण झालें. या कार्यक्रमांत जे पोरकट प्रश्न विचारण्यांत आले त्यावरून विचारण्याच्या जागृतीची, बुद्धिमत्तेची आणि प्रसिद्धीलोलुपतेची कींव करावीशीं वाटली. 'सर्वोत उत्कृष्ट मेकअप कोणता' यासारखा निर्बुद्ध प्रश्न विचारणारा रसिक श्रोता व तत्सम सज्जन हीच जर आपल्या नाट्याभ्यासकांची पातळी असेल तर मार्कोव्हसारख्या नाट्य-तज्ञांनीं आपल्या अनुभवी वाणीनें कितीही पाणी ओतलें तरी हा त्रिनबुडाचा घडा कधींहि भरणार नाहीं. आणि मग असें वाटतें कीं मग असले उपद्व्याप आयोजित करून परकीयांपुढें आपल्या अकलेचें हें प्रदर्शन कशासाठीं ? त्यापेक्षां आमच्या स्टॅनिस्लॉव्हस्की, पुदोवकीन, आयझेन स्टाईनना अज्ञानी श्रोत्यांच्यापुढें व्याख्यानें देण्याची संधी देऊन दोघांनाही कृतकृत्य होण्याचें समाधान द्यावें हेंच जास्त युक्त ठरेल.

## अभिनेत्यांतील एक अष्टपैलू कलावंत गेला

डिसेंबरच्या सोळा तारखेला हॉलिवुड येथें सुप्रसिद्ध अमेरिकन चित्रपट नट चॉर्लस् लॉटन् ह्याचें कॅन्सरच्या रोगानें निधन झालें. अमेरिकेंतल्या रंगभूमीवर व बोलपटांत त्यानें आपलें एक विशिष्ट स्थान निर्माण केलें होतें. 'बॅरेटस् ऑफ विंपोल स्ट्रीट' मधलें त्याचें कठोर पित्याचें काम, 'हंच बॅक ऑफ नॉत्रदाम' मधील कुबड्याची भूमिका, 'विटनेस फॉर ध प्रॉसिक्युशन' मधील वकिलाची भूमिका ह्या त्याच्या गाजलेल्या अशा अद्वितीय भूमिका होत. ह्याशिवाय 'ला मिझराब्ल', 'म्युटिनी ऑन ध बाउंटी' हे त्याची प्रमुख भूमिका असलेले चित्रपट गाजलेले होते. इंग्लंडच्या पार्लमेंटमध्यें चर्चिलच्या व्यक्तिमत्वाचें जें आकर्षण होतें






तसेंच आकर्षण हॉलिवुडच्या चित्रपटसृष्टींत लॉटन्चें होतें. तशीच स्थूल देहयष्टि, तसाच खडा व लवचिक आवाज, तशीच मिस्कील आणि तीक्ष्ण नजर आणि तसेंच प्रसंगावधान आणि समरसता चार्लस लॉटन्च्या अंगी असल्यामुळें त्याला लोकप्रियता लाभूं शकली. भूमिका लहान असो कीं मोठी असो. ती नीट समजून घेऊन आपलें कौशल्य पणाला लावून ती साकार उभी करावयाची हें लॉटनचें वैशिष्टय होतें. त्याला खलनायकाच्या भूमिका विशेष आवडत. कारण त्यांत त्याच्या अष्टपैलु व्यक्तिमत्वाला पूर्णपणें वाव मिळत असे. १९२८ मध्यें त्यानें चित्रपटांत काम करण्यास सुरुवात केली तेव्हांपासून गेलीं चौतीस वर्षें त्यानें अमेरिकन चित्रपटसृष्टींत आपलें अग्रस्थान अबाधित राखलें. चित्रपटां-शिवाय रंगभूमीवरही त्यानें भूमिका केल्या होत्या. लंडनच्या सुप्रसिद्ध ओल्ड व्हिक कंप-नींत काम करत असतांना बर्नार्ड शॉचे मेजर बार्बरा नाटक त्यांनीं रंगभूमीवर आणलें व तें लोकप्रियही झालें. शेक्सपिअरच्या मॅकबेथ, किंग लीअर इत्यादी नाटकांतल्या त्यांच्या भूमिकाही अतिशय गाजल्या होत्या. लंडनच्या स्कारबरो विभागांत १८९९ सालीं जन्मलेले लॉटन १९५० सालीं अमेरिकेचे नागरिक झाले व हॉलीवूड हेंच त्यांनीं कार्यक्षेत्र मानलें. लॉट-ननीं इंग्लंड–अमेरिकेंत नाट्यवाचनाचा केलेला उपक्रमही यशस्वी झाला. अशा ह्या अष्टपैलु कलावंताच्या निधनानें अमेरिकन चित्रपटसृष्टि व ब्रिटिश रंगभूमि एका गुणी नटाला हरपली आहे.

—सारस्वत

## बालरंजनाची तिळा !

लिट्ल थिएटर बालरंगभूमीचं ' अलिबाबा आणि चाळीस चोर " हें सहावं नाटक. बालरंगभूमीची ह्या नाटकापूर्वींचीं नाटकें फार गाजलीं. सहाजिकच ह्या नव्या नाटकाबद्दल ( छोट्या नि मोठ्या सुद्धां ! ) प्रेक्षकांना फार अपेक्षा होत्या. अलिबाबा आणि चाळीस चोर ही कथा मुलांना परिचित व आवडती. अनेक सुरस व विलक्षण वेधक घटना असल्यामुळें बालप्रेक्षकांना खुष करण्याचें सामर्थ्य कथेंत निश्चित आहे. अशा ह्या कथेचा नाट्याविष्कार लिट्ल थिएटरच्या नेहमीच्या सफाईनें रेखीव झाला नसला तरी बराच ठाकठिकपणं झाला आहे. बाल प्रेक्षकांच्या दृष्टीनें नाटक कसं सादर केलं गेलं हा मुद्दा गौण ठरतो. बाबालोकांना हें नाटक आवडलं यांत शंका नाहीं. त्यांच्या-कडून होणारा उत्स्फूर्त, उत्साहपूर्ण गलका ही यशाची पावती.

राजा पटवर्धन ह्यांचीं गीतें अगदींच सुमार–मुलांसाठीं खास लिहिलेल्या गाण्यांत काव्य, कल्पनाविलास व गेयता अभावानेंच तळपली ! पार्श्वसंगीत नाटकाशीं समरस झालेलें नव्हतें. नाटकांतील गुहेची व बुधल्याची कल्पना एरव्ही चांगली उतरली असली तरीसुद्धां नेपथ्य परिणामकारक करण्यास खूपच वाव आहे— अद्भुतरम्यतेला वाव असूनही हें नाटक ' अल्लाउद्दीन व जादूचा दिवा ' एवढं नेत्रोद्दीपक वाटत नाहीं ह्याचं हें प्रमुख कारण !

सौ. सुधा करमरकर ह्यांची बालरंगभूमीसाठीं चाललेली, बालगोपालांना आनंदाचा ठेवा मिळ-वून देणारी ही निष्ठापूर्वक चळवळ धन्यवादास निश्चित पात्र आहे. बालरंगभूमीला आतां उर्जितावस्था येण्याचीं चिन्हें स्पष्ट दिसत आहेत. कुणाही कलावंताला हेवा वाटावा एवढें मातबर कार्य त्यांनीं केलें आहे. कसलीहि कुचराई न करतां, परिश्रमपूर्वक करीत आलेल्या त्यांच्या ह्या कार्याचें भरघोस कौतुकही झालेलं आहे. परंतु असेहि एक विचार मनांत येऊन जातो कीं, निव्वळ प्रोत्साहन, कौतुक ह्याच्याही पलि-कडे जाऊन या चळवळीच्या थबकलेल्या स्वरूपासंबंधीं साक्षेपी व चिकित्सक दृष्टीनें विचार व्हायला हवा—चळवळीच्या प्रगतीसाठीं ! नाटकांचे विषय, ते मांडण्याची पद्धत, नाट्य-माध्यमावरील सराईत कसबामुळें मुलांना आकर्षून घेण्याच्या त्याच लकबी इत्यादी गोष्टींची एक ठराविक चाकोरी बनूं नये ही अपेक्षा. कदाचित् सौ. सुधाबाईंच्याही ध्यानांत ही गोष्ट आली असणं शक्य आहे. त्यांच्याही ह्याबाबतींत कांहीं अडचणी असतील. त्याची जाणीव हा विचार मांडतांना ठेवलेली आहे. परन्तु बालरंजनाबरोबरच बालप्रेक्षकांतून उद्यांच्या रंगभूमीचे सुजाण व चिकित्सक प्रेक्षक निर्माण करण्याचं काम सौ. सुधाबाईंच्या हातून अनायासेंच होत आहे. म्हणूनच ' तिळा तिळा दार उघड ' असं म्हणून अलिबाबा गुहेंत जातांच अनेकविध वस्तू पाहून चकित झाला, तसंच या बालरंगभूमीवर मुलांच्या अभिरुचीला, रसिकतेला, प्रतिभेला नवीं जगें, नव्या दिशा दिसण्यासाठीं ही चाकोरी सोड-ण्याची आवश्यकता. सौ. सुधाबाईंनीं ह्याचा विचार करावा एवढीच ह्यामागची भूमिका. आणखी एक सूचना. खास मुलांसाठीं असलेला कार्यक्रम आंखीव व आटोपशिर असणं इष्ट आहे. त्या दृष्टीनें नाटक वेळेवर सुरू होणें व मध्यंतर न लांबवण्याकडे लक्ष देणें जरूर आहे. सौ. सुधाबाईंच्या नाटकांतून ' मध्यंतरा 'लाच अधिक वाव मिळत चालला आहे. दोन अंकां-मध्यें होणाऱ्या ' ह्या ' नाटकानें मुलांना बराच कंटाळा येतो. अंक मूठभर व मध्यंतर हातभर हा ' जादूच्या वेल 'च्या वेळेचा अनुभव अलिकडे येत नाहीं. तेव्हां ह्या दृष्टीनें सहेतुक प्रयत्न होत असलेच पाहिजेत, पण अजूनही प्रगतीला खूप वाव आहे एवढंच सुचवायचं !

—रसिक मनोहर

## प्रासादिक कृतीचा सुवर्ण–गौरव

गोमंतकीय साहित्य संमेलनांत गतवर्षीच्या उत्कृष्ट साहित्याबद्दल साहित्यिकांचा गौरव करण्याची प्रथा आहे. यंदा सर्वोत्कृष्ट साहित्याचें सुवर्णपदक सुप्रसिद्ध साहित्यिक गोपाळकृष्ण भोबे ह्यांना देऊन त्यांचा गौरव करण्यांत आला. यंदाचें साहित्यसंमेलन आपल्या मायभूमध्यें भरविण्यांत आलें होतें त्यामुळें आपल्या इष्ट-मित्रांच्या हजेरींत सुवर्णपदक प्रत्यक्ष घेण्याचें भाग्य श्री. भोब्यांना लाभलें ही घटना विशेष उल्लेख-नीय आहे. गोपाळकृष्ण भोब्यांचा गौरविलेला ग्रंथ म्हणजे विविध कलावंतांच्या कलानैपुण्याचें रसग्रहण करणारीं शैलीदार व्यक्तिचित्रें ज्यांत एकत्रित केलीं आहेत तो ' चतुरंग रेखा. ' श्री. भोबे ह्यांनीं गेलीं कित्येक वर्षें जें चतुरस्र लेखन केलें आहे त्याची पहिली ओंजळ भक्तिभावानें कलादेवी सरस्वतीच्या चरणीं त्यांनीं अर्पण केली. तिचें प्रसादचिन्ह प्रस्तुत सुवर्णपदकानें त्यांच्या पदरांत पडलें आहे. श्री. भोब्यांचें हें पुस्तक पहिलेंच असलें तरी तें होतकरू लेखक गणतां येणार नाहींत. त्यांच्या



लेखनांतला प्रसाद, अधिकृत विवरण व सहज-सुंदर समरसता अभिजात ठरावी इतकी त्यांनी आत्मसात केलेली आहे. आकाशवाणीवरचें साहित्य-समालोचन, दर्जेदार मैफलीचें रसग्रहण, समकालीन ऐतिहासिक कलावंताच्या नादलुब्ध आठवणी, चित्रकला--प्रदर्शनाचें वैशिष्टय आणि बुंद्धिजड व्याख्यानाचे सार-संकलन हें त्यांनीं सारख्याच तन्मयतेनें व रसिकवृत्तीनें केलेलें आहे. नम्रता हा त्यांच्या स्वभावाचा स्थायीभाव असल्यामुळें त्यांनीं आपल्या ज्ञानाचें (शक्य असूनही) कधीं अवडंबर केलें नाहीं. एवढेंच नव्हे तर आपल्या उपजत वा अभ्यस्त चित्र, नाट्य व गायन कलांचा त्यांनीं प्रगट उल्लेख किंवा थिल्लर प्रदर्शनही कधीं केलें नाहीं. आपलें काम प्रसिद्धीविन्मुखतेनें खालीं मान घालून शिस्तीनें व नीटनेटकेपणानें करत रहाणें हेंच त्यांनीं आयुष्याचें इतिकर्तव्य मानल्यामुळें एक नेकीचा विश्वासू रसिक माणूस म्हणून त्यांचे परिचित त्यांना ओळखतात. जीवनाचा पूर्वभाग बेदिल मनःस्थितींत कंठण्याची पाळी येऊनही त्यांचा पीळ तुटला नाहीं. जिद्दीनें त्यांनीं आयुष्याशीं झुंज दिली व देतही आहेत. अजातशत्रु म्हणून लौकिक व्हावा इतका त्यांचा व्यापक व विविध मित्रसंभार असूनही त्यांच्या व्यक्तिमत्वाचे अनेक पैलु अज्ञात ठरावे इतके ते ह्यावाबर्तीत अबोल आहेत. श्री. भोबे ह्यांच्या संस्कारित जीवनाचे झंकार यथार्थपणें प्रगट करणारा 'चतुरंग रेखा' हा संग्रह गोमंतकीय साहित्यांतच नव्हे तर महाराष्ट्रीय साहित्यांतही आगळा ठरावा, आणि म्हणूनच प्रस्तुत सुवर्णपदकानें त्यांचा झालेला गौरव भावीकाळांत उत्तरोत्तर वाढत जावा असें चिंतून श्री. भोब्यांचे आम्हीं हार्दिक अभिनंदन करतों.

—सारस्वत

# गोमंतक विलिनीकरण संमेलन

गोमंतक मराठी साहित्य संमेलनाचें अकरावें अधिवेशन नऊ वर्षाच्या दीर्घ कालावधीनंतर स्वतंत्र गोमंतकांत भरलें. स्वातंत्र्यानंतरचें हें पहिलेंच अधिवेशन असल्यानें तें अनेक दृष्टींनी वैशिष्टयपूर्ण व्हावें, अलौकिक व्हावें अशी अनेकांची अपेक्षा होती; पण ती अपेक्षा सर्वतोपरी पूर्ण झालेली दिसली नाहीं. उत्साह दिसला; पण तो कांहीं टक्के वगळता वरवरचा होता.

याचीं कारणें खूप आहेत. गोमंतक भारतांत विलीन झाल्यापासून गेल्या एक वर्षांत ज्या अव्यापारेषु-अंधाधुंदीच्या गोष्टी घडल्या त्यामुळें अशा सांस्कृतिक उद्धाराकडचें लोकांचें लक्ष साफ उडालें. सामान्य माणसाची दिशाभूल करणारे 'पक्ष' अहमहमिकेनें सरसावल्यामुळें उमदी माणसें गोंधळांत पडलीं. भाषिक वादहि जबरदस्तपणें फोफावला. त्यानें खोलवर मूळ धरलें; परंतु गेलीं कित्येक वर्षें चाललेल्या तिथल्या भाषिक चळवळीकडे महाराष्ट्रानें अजिबात लक्ष दिलें नाहीं. गेल्या एका तपांत कोंकणी भाषिकांनीं जेवढा जोरदार प्रचार केला, प्रचाराकरितां जेवढीं पुस्तकें छापलीं आणि नियतकालिकें काढलीं तेवढा प्रचार मराठीवाद्यांनीं केला नाहीं. महाराष्ट्र सरकारनें तर तिकडे अजिबात दुर्लक्ष केलें.

वास्तविक महाराष्ट्राच्या व गोमंतकाच्या संस्कृतींत तिळमात्र फरक नाहीं. महाराष्ट्रधर्म हाच गोमंतक धर्म आहे. महाराष्ट्राचा भक्त-संप्रदाय हाच गोमंतकाचा भक्तसंप्रदाय आहे. जे उत्सव, जीं कीर्तनें, ज्या कथा महाराष्ट्रांत चालतात त्याच गोमंतकांतहि चालतात. अनादिकालापासून गोमंतकियांच्या रक्तांत महाराष्ट्रीय संस्कृतीचेंच बीज मूळ धरून आहे. असें असतांना गोमंतक महाराष्ट्रांत विलीन झाला तर त्याचें अकल्याण होईल असें एका पक्षाला वाटतें. आणि याच प्रश्नावर रणें माजून दोन दिवसांचा तो साहित्य-सोहळा संपला. तिथल्या साहित्यिकांना खास असें मार्गदर्शन झालें नाहीं. साहित्यावर चर्चा झाली नाहीं.

निकृष्ट साहित्य कोणतें, उत्तम साहित्य कोणतें, सांस्कृतिक उद्धाराचे मार्ग कोणते, कोणते प्रश्न हाताळून गोमंतकाची साहित्यभक्ति व सांस्कृतिक अस्मिता जागृत ठेवली पाहिजे याविषयीं कांहीहि चर्चा झाली नाहीं, ती तरी झाली पाहिजे होती.

कोंकणीवाद्यांनीं ज्या मार्गानें प्रचार चालविलेला आहे तो मार्ग चांगला नाहीं हें त्यांनाही पटावें; परंतु अंतर्गत कलहानेंच अशी विपरीत दिशा पकडलेली आहे, कीं खरा मार्ग कोणता, याचा निर्णय काळच देईल, एवढेंच सांगण्याखेरीज दुसरा उपाय नाहीं.

— दूधसागर

# कलानंदांत रंगलेली चित्रकला शिक्षक परिषद

महाराष्ट्र राज्यांतील चित्रकला शिक्षकांची पहिली परिषद पुणें येथें श्रीशिवाजी मराठा हायस्कूलमध्यें दि. २९,३० व ३१ डिसेंबर रोजीं भरली. महाराष्ट्रांतील जवळजवळ सर्व जिल्ह्यांतून सुमारें ४०० प्रतिनिधी या परिषदेस हजर राहिले यावरून अशा तऱ्हेच्या परिषदेची अत्यंत गरज होती हें सिद्ध झालें. परिषद अयोजित केली पुणें जिल्हा चित्रकला शिक्षक संघानें आणि या परिषदेच्या चिटणीसपदाची धुरा वाहिली चित्रकार प्रा. भय्यासाहेब ओंकार यांनी.

या परिषदेला उद्‌घाटक म्हणून महाराष्ट्र राज्याच्या शिक्षणखात्याचे सहसंचालक श्री. बंबावाले हे आसल्यामुळें परिषदेला एकप्रकारें सरकारी पुरस्कार लाभल्यासारखें झालें. या परिषदेच्या निमित्तानें भरविण्यांत आलेल्या प्रदर्शनाचें उद्घाटन 'सकाळ'चे संपादक डॉ. ना. भि. परुळेकर यांनी केलें.

परिषदेचे अध्यक्ष म्हणून टाईम्स ऑफ इंडियाचे आर्ट डायरेक्टर श्री. ज. द. गोंधळेकर यांची योजना करण्यांत आली होती. कला शिक्षणक्षेत्रांतील श्री. गोंधळेकर यांचा मौल्यवान अनुभव, कलाशिक्षणाच्या क्षेत्रांतल्या नव-विचारांचा पुरस्कार करण्याबाबत त्यांची मनापासूनची तळमळ आणि अध्यक्षपदाला योग्य असा मनाचा समतोलपणा यामुळें या परिषदेतल्या वातावरणावर एक प्रकारची नवचैतन्याची आणि भारदस्तपणाची छाप सतत टिकून होती.

आपल्या अध्यक्षीय भाषणांत श्री. गोंधळेकरांनी कांहीं महत्वाचे विचार व्यक्त केले. ते







अनुक्रमणिका


बावा, त्या तुमचा फोन—...

म्हणाले, 'कलाशिक्षक आणि कलावंत ह्यांची कार्यक्षेत्रें भिन्न आहेत. आजकाल कलाशिक्षकांसाठीं म्हणून जो अभ्यासक्रम रूढ आहे तो सदोष आहे. कारण त्या अभ्यासक्रमांत परीक्षेस बसणारा उमेदवार हा कलावंत म्हणून कितपत लायक आहे हें पाहिलें जातें. तो शिक्षक या नात्यानें कितपत यशस्वी होऊं शकेल याचा विचार केला जात नाहीं. त्यामुळें शालेय जगांत तो मागे पडतो. शालेय व्यवस्थेसंबंधीही त्याला माहिती नसल्यानें चित्रकला शिक्षक कधींच मुख्याध्यापक होऊं शकत नाहीं.' कलाशिक्षकानें व्यासंगी बनलें पाहिजे असेंही त्यांनीं सांगितलें.

या परिषदेंत 'आजची कला प्रगतिशील आहे कां?' या विषयावर नामवंत कलाभिज्ञांचा एक परिसंवाद ठेवण्यांत आला होता. या विषयावर नामवंत कलाभिज्ञाचा एक परिसंवाद ठेवण्यात आला होता. या परिसंवादांत प्रा. दि. के. बेडेकर, श्री. एम्. आर्. आचरेकर, श्री. माधव सातवळेकर, श्री. नि. म. केळकर या कलारसिकांनीं भाग घेतला आणि त्याचा समारोप सर जे. जे. स्कूल ऑफ आर्टचे डीन श्री. पी. ए. धोंड यांनीं केला. परिसंवादांत भाग घेणाऱ्या वक्त्यांनीं वक्त्यांनी जीं भाषणें केलीं त्यांत एकसूत्रता नव्हती. ज्याला जे विचार व्यक्त करावेसें वाटलें ते त्यानें केलें. पण असें असूनही या साऱ्या वक्त्यांच्या तोंडून एक महत्वाचा निष्कर्ष निर्भिडपणें बाहेर पडला. तो असा कीं 'आजची कला ही प्रगतीपथावर आहे कीं नाहीं हें ठरवणें कठीण आहे. या कलेतला नवीनपणा हा युरोपांतील कलेच्या अंधानुकरणानें प्राप्त झालेला आहे. या कलेचें भारतियत्व सिद्ध झाल्यांशिवाय तिची 'प्रगती' म्हणून वाखाणणी करणें इष्ट नाहीं.'

श्री. एम्. आर्. आचरेकरांनीं त्यांच्या प्रतिभाशाली कुंचल्यानें जलरंगांत व्यक्तिचित्राचें व फिल्म इन्स्टिटयूट ऑफ इंडियांतील शिल्पकला शिक्षक श्री. बी. डी. थत्ते यांनीं शिल्पकलेचें प्रात्यक्षिक दाखवलें या व्यतिरिक्त कलाशिक्षकांना उपयुक्त ठरतील अशाही व्याख्यानांची योजना करण्यांत आली होती. मुंबईचे श्री. आर्. पी. जोशी यांनीं 'रंगविज्ञाना'ची माहिती सांगून रंग हे वस्तूशीं संबंधित नसून प्रकाशाशीं संबंधित असतात ही गोष्ट प्रोजेक्टरच्या सहाय्यानें रंगीत स्लाईडस् दाखवून पटवून दिली. कलाशिक्षण हें व्यक्तिविकासाच्या दृष्टीनें किती महत्वाचें आहे यासंबंधीं पनवेलचे श्री. व. ज्ञा. कानिटकर हे बोलले. पुण्याचे श्री. ज. पा. आपटे यांनीं कलाशिक्षणांतल्या नव्या माध्यमांसंबंधीचे आपले प्रयोग सांगितले. पुण्याचे श्री. रा. अ. साठे व हडपसरचे श्री. ल. मा. सुभेदार या दोघां मुख्याध्यापकांनी कलाशिक्षकांविषयींच्या अपेक्षा बोलून दाखविल्या. अखेरीस महाराष्ट्र राज्याचे ड्रॉईंग इन्स्पेक्टर श्री. व्ही. के. पाटील यांनीं 'चालू अभ्यासक्रमांचा अन्वयार्थ' समजून सांगितला. 'चालू अभ्यासक्रमांत शिक्षकांच्या कर्तृत्वाला भरपूर वाव ठेवला असून परिस्थितीनुरूप कलाशिक्षकानें अभ्यासक्रमाला योग्य तें वळण द्यावें,' असें ते म्हणाले. कलावंत निर्माण करण्यापेक्षां कलारसिक बहुसंख्येनें निर्माण करणें हे शाळेतील चित्रकला शिक्षकाचें खरें काम आहे असेंही त्यांनीं सांगितलें. या परिषदेच्या निमित्तानें अभिनव चित्र विद्यालयांत भरविण्यांत आलेलें प्रदर्शन फारच प्रेक्षणीय ठरलें.

या परिषदेंत कलाशिक्षकांच्या अनेक मागण्यांना ठरावाच्या रूपानें वाचा फुटली. विदर्भ, मराठवाडा आणि जुन्या मुंबई राज्यांतील भाग यांच्या कलाशिक्षणांत मेळ नाहीं. पगारांच्या श्रेणी ठरलेल्या नाहींत. ग्रेड परिक्षांचे क्लासेस चालविण्याबद्दल सर्वच शाळांकडून योग्य तो मोबदला कलाशिक्षकाला मिळत नाहीं. नित्य नूतन प्रयोगावर जे शिक्षण आधारित हवें असें कलाशिक्षणाचें क्षेत्र पण त्यांत रिफ्रेशरी कोर्सची सोय नाहीं. खेड्यापाड्यांतून कलाशिक्षणाचा एवढा अंधार कीं तिथें फिरतीं प्रदर्शनें, ग्रंथालयें आणि नित्य देखरेख ठेवणारा ड्रॉईंग इन्स्पेक्टर यांची गरज नेहमींच भासत असून त्याबाबतींत सरकार अजून कांहीं विशेष लक्ष घालीत नाहीं. पुण्याच्या परिषदेंत या संबंधी ठराव मांडण्यांत आले पण हे ठराव सरकार विचारांत घेणार कीं, 'दप्तरीं दाखल' करणार हें आतां पहायचें!

—कलाब्धि

## कर्तबगार महिला
## श्रीमती पुष्पाताई दुनाखे

आजच्या सुधारलेल्या युगांत पुरुषांच्या बरोबरीनें महिला काम करीत आहेत हें खरें असलें, तरी ज्यांना समाजांत मिसळण्याची संधि आलेली नाहीं किंवा ज्या संसारांत व्रतस्थजीवन व्यतीत करीत आहेत अशा जुन्या पिढींतील महिलाहि प्रसंग पडताच आल्या प्रसंगाला तोंड देऊन संसार सावरण्यासाठीं कंबर बांधून प्रयत्नांची पराकाष्ठा करतात आणि दृढ निश्चयानें व चिकाटीनें समाजांत मानाचें स्थान प्राप्त करून घेतात. अशा महिलांत श्रीमती पुष्पाताई त्र्यंबक दुनाखे यांची खास गणना करावी लागेल.

मूळच्या जळगांवच्या या भगिनीनें स्वतः परिश्रमानें आणि आयुर्वेदिक शास्त्रशुद्ध पद्धतीनें अलिकडेच एक केशवर्धक तेल तयार केलें असून त्या तेलाची वाखाणणी आतां थोरामोठ्यांनीहि केलेली आहे हें विशेष होय. त्यांच्या या केशवर्धक तेलाचें नांव आहे 'शकुंतला हेअर ऑईल'. त्यांच्या या अजब, गुणकारी तेलानें गळणारे केस थांबतात. वैद्य-धन्वंतऱ्यांनी त्यांना या गुणकारी तेलाच्या बाबतींत प्रशस्तीपत्रें दिलीं आहेत. हें शुद्ध आयुर्वेदिक पद्धतीनें तयार केलेलें तेल महिलांना देऊन त्यांचेकडूनहि त्यांनीं वाहवा मिळविली आहे. आज अखिल महाराष्ट्रांतून त्यांच्या तेलास जबरदस्त मागणी येत आहे. आणि आतां दादर येथें मोठ्या प्रमाणावर शकुंतला तेलाचा व शिकेकाईचा कारखाना उघडण्याची त्यांची खटपट सुरू आहे.

—सदानंद चवेंदणकर



अनुक्रमणिका



**शिंग फुंकिलें रणीं, वाजतात चौघडे, सज्ज व्हा उठा उठा, सैन्य चाललें पुढें !...**

सतत आणि नियमित बचत करण्याचा निर्धार करून, निर्धारानें युद्ध आघाडीवर कूच करणाऱ्या आपल्या शूर सैनिकांच्या तालवध्द संचलनाला साथ द्या. स्वातंत्र्यनिष्ठेच्या सत्त्वपरिक्षेच्या या काळांत संरक्षण कार्यासाठीं रक्त आणि अविरत श्रम यांची गरज आहेच—पण त्याशिवाय महिन्यां-मागून महिने, वर्षामागून वर्षें पैशांचा ओघ सतत वाहायला हवा आहे. आयुर्विमा पॉलिसी घेऊन तुम्ही तुमचा निर्धार व्यक्त करूं शकाल. नियमितपणें तुमच्याकडून भरल्या जाणाऱ्या विम्याच्या हप्त्यांतून संरक्षण कार्याचा वेग वाढणार आहे. आयुर्विम्याच्या रूपानें बचत करून तुम्ही केवळ तुमच्या आणि तुमच्या कुटुंबाच्याच नव्हे, तर तुमच्या देशाच्याहि सुरक्षिततेसाठीं फार मोठा हातभार लावणार आहांत.

आयुर्विमा कॉर्पोरेशननें प्रारंभ म्हणून राष्ट्रीय संरक्षण रोख्यांत ५ कोट रुपये गुंतविले आहेत. तुम्ही तुमच्या आयुर्विम्यांत गुंतविलेल्या बचतीचा इतका सार्थ उपयोग याहून दुसरा कोणता असूं शकेल ?




**लाईफ इन्शुअरन्स कॉर्पोरेशन ऑफ इन्डिया**

ASP,LIC/D-1 MAR

